


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक ३२१-३२२ / एप्रिल ते सप्टेंबर २००७

**डॉ. गं. ना. जोगळेकर**

कार्याध्यक्ष, म.सा.प. पुणे

१ एप्रिल १९९५ ते १४ ऑगस्ट २००७

अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३२१-२२
एप्रिल ते सप्टेंबर २००७

•••






**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०
दूरभाष - २४४७५९६३

अनुक्रमणिका



## अनुक्रमणिका




मुद्रक-प्रकाशक
**डॉ. वि. भा. देशपांडे**
प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.**

संगणकीय अक्षरजुळणी, मुद्रणस्थळ
**जंगम ऑफसेट प्रा. लि., २५/१० नांदेड फाटा,**
सिंहगड रस्ता, पुणे - ४११ ०४१

**किंमत १५/- रुपये**

प्रकाशन : ऑक्टोबर २००७

संपादकीय

# चांदणसमीक्षा !

सरोजिनी वैद्य गेल्या !

जगप्रसिद्ध कादंबरीकार जॉन ब्रायन याने आपल्या लेखनप्रेरणेविषयी बोलताना मार्मिक भाष्य केले आहे–

"...We human beings cannot reach each other very well..." माणसे एकमेकांवर विश्वास ठेवत नाहीत, एकमेकांकडे संशयाने पाहतात. आपापल्या मनाचे दरवाजे बंद करून आपण जगत असतो. दुर्लक्ष, उपेक्षा, बेफिकिरी भीती, अविश्वास यांनी घेरलेले आपण 'बंद दरवाजा' ठोठावणे तर दूरच. साधे ढकलूनही पहात नाहीत. जीवन त्यांना कळत नाही; परंतु सरोजिनीबाई जीवनाला सरळ सामोऱ्या जाणाऱ्या होत्या. तो यांच्या ललित लेखनाचा जीवनसापेक्ष शोधप्रवास आहे. अरुण शेवते यांनी संपादित केलेल्या 'उरतात त्या आठवणी' (सप्टेंबर २००२) मधील 'मळभ आणि उन्ह' ह्या अगदी अलिकडच्या लिखाणातही माणसाच्या मनाच्या अगम्य गुहेचा ललित शोधप्रवास आहे. प्रभाकर पाध्ये आणि कमल पाध्ये सारख्या समंजस विद्वान-विदुषींनाही एका प्रसंगी झालेला गैरसमज, त्यानंतर वर्ष-दीडवर्ष पाध्ये पतीपत्नींनी केलेली जीवघेणी उपेक्षा... आणि अखेर सरळ सामोरे जाऊन पाध्येंच्या मनाचा दरवाजा उघडून पुन्हा पूर्ववत् नाते जुळविले. त्या म्हणतात, 'मनुष्य स्वभाव ही जशी- एका बाजूने अगम्य गोष्ट आहे, तशीच समजून घ्यायची ठरवली तर बरीच समजण्यासारखीही आहे... कुणी 'हलक्या कानाचे' असतात तर 'कुणी कान फुंकण्यात' पटाईत असतात... माणसाचं हे असलं सगळं जगणं प्रतिभावंतांनी कधी गंभीरपणे 'ऑथेल्लो' सारख्या शोकात्मिकेत तर कधी गमतीगमतीनं 'संशयकल्लोळ' सारख्या सुखात्मिकेत व्यक्त केलं आहे.' मराठी साहित्यसृष्टीतील उल्लेखनीय लेखनकृतींची सहृदयतेने समीक्षा करीत, तर कधी नाट्यछटाकार दिवाकर किंवा वामन मल्हार जोशी यांच्या व्यक्तिमत्त्वाचा, त्यांच्या भावविश्वाचा- माणूसपणाचा शोध त्यांनी घेतला. सरोजिनी वैद्यांची समीक्षा अशी सहृदय ललितरम्य आहे. समीक्षेच्या परिभाषेत ती आस्वाद-समीक्षा, चरित्र-समीक्षा अशा पढीक समीक्षेच्या पलिकडची आहे. वा. ल. कुलकर्णी यांच्या भाषेत म्हणायचे तर समीक्षेच्या निमित्ताने केलेले ते एक जीवनचिंतन आहे. 'जीवनविषयक' आणि कलाविषयक प्रश्नांचा गंभीरपणे परंतु रसिकतेने शोध घेऊ पाहणाऱ्या कोलंबसाच्या प्रवासासारखाच हा जीवनसागरातील एक साहित्य प्रवास !

मूल्यांच्या संघर्षात माणूस जगत असतो; आणि मोठाही होतो. डॉ. आनंदीबाई जोशींशी आपले वृत्तिसाम्य शोधणाऱ्या काशीबाई कानिटकर सरोजिनीबाईंच्या ललित लेखणीला मोठे आवाहन होते. डॉ. आनंदीबाई आपल्या न्यूनगंडाशी झगडू शकल्या नाहीत. मात्र काशीताई कानिटकर आपल्या न्यूनगंडाशी झगडल्या. रावसाहेब कानिटकरांच्या योग्यतेचे होण्यासाठी शिकल्या. कथाकार आणि कादंबरीकार म्हणून त्यांचे नाव काळावर कोरले गेले. जस्टिस कानिटकरांचे नाव काशीताईंमुळे जगाला कळले !

सरोजिनीबाईंच्या ललित-लेखनाच्या रसशाळेत भावरसायन सर्वांगांनी प्रकट झाले. मातीतून प्रकटणारी मूर्ती म्हणजे सुरवंटाचे होणारे फुलपाखरू ! जीवनोद्यानाच्या फुलाफुलांवरील मरंद शोषून ललितगद्याचा मनोरम प्रवास अनुभवणे; आणि त्या अमृतानुभवाचा रसरूपरंग 'ये हृदयीचे ते हृदयी' अलवार भाषेच्या माध्यमातून पोहोचविणे हे त्यांच्या ललितलेखनाचे हार्द आहे. आपले साहित्याशी असलेले नाते केवळ समीक्षेचे नाही. साहित्यानुभवातून जीवनसत्याची ओळख करून घेणे, साहित्याचे मूळ असलेल्या जीवनाची समीक्षाच मार्गदर्शक असते. म्हणूनच त्या म्हणतात, 'कलेपेक्षा जीवनाचे निरीक्षक,





अनुक्रमणिका

परीक्षक असलेले लोकच मला अधिक जवळचे वाटतात. मी माझे एक घर त्यांच्या घरातच बांधलेले असते.' याच भूमिकेतून त्यांनी समग्र दिवाकर (१९९६), रमाबाई रानडे-व्यक्ती आणि कार्य (१९६१), नानासाहेब फाटक-व्यक्ती आणि कला (१९८४), गोपाळराव हरी (१९७८) इतिहासकार शेजवलकर, काशीताई कानिटकर इत्यादी जीवनसापेक्ष ग्रंथनिर्मिती केली. 'पहाटपाणी' आणि 'शब्दायन' मधून असेच जीवन चिंतन आहे. त्यांचे मराठीचे तास केवळ विद्यापीठ परीक्षेसाठी बेतलेली व्याख्याने नसत. साहित्य आणि जीवनाच्या मूल्यविवेकाचे प्रकट चिंतन असे. राज्य मराठी विकास संस्थेच्या पहिल्या संचालिका म्हणून त्यांना यथायोग्य मानाचे स्थान मिळाले.

समीक्षा म्हणजे परभृत लिखाण- असे स्वतःला निर्मितीक्षम समजणारे काहीजण मानतात. श्रेष्ठ कलाकृती ही साहित्यसूर्य असेल कदाचित, परंतु सूर्यापासून प्रकाश घेऊन त्याचे चांदणे देणारा रजनीनाथ जसा आल्हादक; तशी सरोजिनी वैद्यांची समीक्षा आल्हादक ललितरम्य आणि स्वतंत्र जीवन समीक्षा आहे. सौंदर्यशोधकाची ती एक वृत्ती आणि दृष्टी आहे.

माणसाच्या विविध वृत्ती-प्रवृत्तींच्या पातळीवरील जगण्याचा शोध घेणे सरोजिनी वैद्यांच्या समीक्षेचे चिंतन आहे. 'माती आणि मूर्ती' मधील समीक्षा याचे उत्तम उदाहरण आहे. ही सर्व पुस्तक परीक्षणे म्हणून निमित्तमात्र आहेत. यातून जाणवते ती चिंतनशील संज्ञाप्रवाही समीक्षा. ए.वि. जोशींचे 'काळोखाचे अंग' मधील घनश्याम-दमयंती-मर्लिन-एस्के-सुरेन्द्रा तसेच 'रणांगण' मधील चक्रधर, पु.शि. रेगेंची सावित्री, माधव जुलियनांच्या विरह 'तरंग'चा नायक- हे सगळे शारीरपातळीवरून एका अनामिक गूढरम्य प्रेमभावनेचा शोध घेताना दिसतात. ऐहिक पातळीवरील शरीराच्या माध्यमातून शरीरापलिकडचे काहीतरी गूढरम्य श्रेय मिळविण्यासाठी धडपडतात. दुःखी होतात. प्रेयामागे लागताना श्रेय हरवल्याची जाणीव सर्वांनाच होते. लक्ष्मीबाईंच्या 'स्मृतिचित्रे' मधील 'स्व'निष्ठा आणि पतिनिष्ठा या ओढाताणीत स्वतःचे अस्तित्व शोधणाऱ्या लक्ष्मीबाई टिळकांच्या जगण्याचा अद्‌भुत प्रवास त्यांच्या समीक्षेला अधिक भावतो. विवेकाची कास धरून लेखनप्रपंच करणारे वा. म. जोशी त्यांना वडीलधारे, जीवनाच्या गर्दीतून नेमकी वाट दाखविणारे आजोबा वाटतात. माणसाला बऱ्यावाईट माणूसपणासह ओळखणारे शरदबाबू वाचकांचे, त्यांच्या कादंबरीतील पात्रांशी, नाते निर्माण करतात. शेवटी कादंबरीतील सर्व पात्रे म्हणजे माणसाच्या अंतरंगाकडे जाण्याचा दरवाजाच ! प्रत्येकाचे जगणे खरे असते. ते नाकारणं आपल्या हातात नसते. त्या म्हणतात, 'जगणे अखेर जगण्याच्या स्वभावाने चालायला हवेच.' सरोजिनी वैद्यांनी थोर साहित्यिकांच्या जगण्याशी जवळीक साधून अखेरपर्यंत खरेखुरे जगणे हीच जीवनसाधना व साहित्यसाधना मानली.

'शब्दायन' मधे त्यांनी 'नाट्यछटाकार दिवाकर कृष्णांचा घेतलेला शोध' एक अद्‌भुतरमणीय समीक्षा आहे. शनिवार पेठेतले दिवाकरांचे भाऊ- गर्गे मास्तरांचे भाऊ- एवढा एक धागा हाती लागताच त्यांच्या मदतीने जागोजागी जाऊन दिवाकरांच्या आप्त-मित्रांचा शोध घेऊन दिवाकरांच्या व्यक्तिमत्त्वाचे शब्दचित्र त्यांनी साकार केले. १९१८ ते २० च्या सुमारास प्लेगच्या महामारीने गाव सोडून मोकळ्या रानावर शहरवासीयांना रहावे लागले. काशीताई कानिटकरांचे कुटुंबही याला अपवाद नव्हते. 'शिकली-सवरलीस तर माझ्यासह संसार होईल; नाहीतर नाही.' अशी तंबी त्यांना मुंबईला शिकत असलेल्या पतिराजांकडून (गोविंदराव कानिटकरांकडून) मिळाली होती. त्या प्रेरणेने शिकलेल्या काशीताई कानिटकरांनी दुष्काळग्रस्त परिस्थितीतल्या उघड्या माळरानावर मनोविनोदासाठी सख्यासोयऱ्यांबरोबरच्या 'चांदण्यातील गप्पा' आपल्या लेखणीने शब्द रूप केल्या. त्यांच्याशी संवाद साधणाऱ्या सरोजिनी वैद्यांनी श्रेष्ठ साहित्यकृतींच्या आणि साहित्यसूर्यांच्या प्रकाशाचे दान घेऊन- चांदणसमीक्षा केली. त्या 'चांदण्यातील गप्पा' आता निमाल्या !

... का कुणास ठाऊक, माझे मलाच समजत नसेलही ! पण शंकर वैद्यांची कविता येथे आठवते-

'आधार !'
'...मी पाहात होतो एक अरण्य
सागाची उंचसोट निष्पर्ण पांढरी झाडे
निःशब्द श्वासरहित वातावरण
आणि तू एकटीच चालली होतीस
ओढल्यासारखी
दऱ्याखोऱ्यातून एकटी, भांबावलेली, कावरीबावरी
'राणी थांब, राणी थांब...'
तुला ऐकूच न येणारी माझी मैलोमैल लांब हाक...
दचकून मी जागा झालो
अंग सर्द
अंगावर हात फिरवीत तू म्हणत होतीस.
'घाबरू नको ना असा ! मी आहे ना जवळ !'

❖❖❖

# विकटकवी जोगळेकर !

वाङ्‌मयेतिहास, भाषाविज्ञान, व्याकरण आणि समीक्षा या बिकटवाटेचा सुखेनैव लेखन प्रवास करणारे डॉ. गं. ना. जोगळेकर नर्म विनोदाच्या झुळझुळत्या मिष्कील झऱ्यात पाय टाकून विश्राम घेत असत. हे दृश्य पाहणारे काही भाग्यवंत आहेत. त्यातला मी एक आहे. समीक्षा आणि भाषाविज्ञानाच्या कार्यामुळे 'गं.ना.'च्या चेहऱ्यावरची स्मितरेषा झांकाळोन गेली. नंतरच्या काळात तर प्रशासकीय कामात तिला ग्रहण लागल्यासारखे झाले ! तरीही विकटकवितेची 'डायमंड रिंग' झळाळ दाखवून लुप्त होई ! मुखपृष्ठावरील त्यांची स्मितहास्य करणारी छबी त्याची साक्ष आहे.

माझ्या 'मयसभा' ललितलेख संग्रहाचे प्रकाशन त्यांच्या हस्ते झाले. समारंभानंतरच्या गप्पांच्या मैफिलीत सरांचा मूड पाहून आमच्यातील एकाने धाडस करून म्हटले, ''सर ! मैफल चांगली जमली आहे. 'थोडी, चालेल का ?''

''ठीक आहे, तुमच्या आनंदात होईन सहभागी...!'' मग उत्स्फूर्तपणे म्हणाले, ''कितीतरी दिवसात नाही चांदण्यात न्हालो ! आता शक्य होत नाही... पण तुमचे चालू द्या !'' गप्पांच्या ओघात अनेक कवींनी आपल्या कविता गायल्या. काहींनी किस्से-चुटके सांगून हशा पिकविला. जोगळेकर सरांना मी आग्रह केला, ''सर ! तुमची 'दत्तो वामन पोतदार म्हणजे आहे पुराणा गडी' होऊन जाऊ द्या, मजा येईल !''

''नको या प्रसंगाला ती जुळणारी नाही. पण दुसरी प्रसंगोचित म्हणतो !'' आणि ते म्हणू लागले,
''कितीतरी दिवसांनी, आज लागला आकडा।
आता मीच सिकंदर, मीच इट्टूर फाकडा ।
कितीतरी दिवसांनी प्यालो, विकतची व्हिस्की
आता मीच सार्त्र कानू, आता मीच डोस्टाव्हस्की !
कितीतरी दिवसांनी, आज झोडले मटण
आता तुडुंबले तन... अहो तुटले बटण
कितीतरी दिवसांनी, आज मोगरा फुलला
आता मीच बाजीराव, मीच खय्याम रंगीला
(कितीतरी दिवसांनी गेलो बोलुनिया खरे
पुन्हा काढायला गळा अंगी बळ आले पुरे !)

मर्ढेकरांच्या कवितेचे हे विडंबन रंजक तर आहेच. पण सामान्य कुवतीच्या माणसाचे विदारक भाव चित्र आहे. सामान्य माणसाचे धैर्य, औदार्य, कर्तबगारी आणि प्रेमही कधीच झोकुन देऊन होत नाही. आपले हे सामान्यपण त्याला पदोपदी जाणवते. 'तोतऱ्या नळाच्या' आंघोळीत समुद्रस्नान केल्याचे खोटे जग निर्माण करून तो त्यातच... चुळकाभर पाण्यात बुडून जातो. गंगा स्नान करता आले नाही तर 'मन चंगा तो कठौतमे गंगा' असे फसवे तत्त्वज्ञान तो निर्माण करून त्या फसव्या तत्त्वज्ञानातच जगतो. ह्या फसगतीच्या आयुष्यात मग कधीतरी अचानक 'डीए डिफरन्सची' लॉटरी लागते. मग त्याच्या मर्यादेत तो चैन करतो. त्याच्या अंगी शिकंदराची ताकद आल्याचा त्याला भास होतो. एखादी कविता कुठेतरी छापून आली की आता श्रेष्ठ तत्त्वज्ञांच्या रांगेत आपलीही छबी तो पाहू लागतो. त्याच्या मर्यादित रसिकतेत तो मस्तानीचा बाजीराव होतो; आणि खय्यामचा रूबाया गाऊ लागतो. क्षणाचा पृथ्वीपती होतो. प्रसन्न झालेल्या साक्षात् लक्ष्मीचे दान दुबळ्या झोळीला न झेपणाऱ्या भिकाऱ्यासारखी

त्याची अवस्था होते. ह्या युगायुगांच्या सामान्यत्वाचे हे विडंबन म्हणजे, ''किती तरी दिवसांनी...!'

खडकमाळावर राहणारा हा विकटकवी कधी गांधीजींच्या 'खेड्यात चला' च्या संदेशाने भारावून जाऊन साध्याभोळ्या 'फुरसुंगी' गावी जातो. तिथली भोळीभाबडी जनता 'नाही-रे' च्या गावी आपापल्या सुखसंकल्पनेत जगत असते. त्या गावचे जीवन म्हणजेच आपले खेडे !... हिंडणारे डुकरांचे कळप, पान खाऊन थुंकणारा म्हादबा, विडी फुंकणारा म्हमद्या, आयतं खाऊन पारावर लोळणारी निरूद्योगी माणसे, तसेच शेतात घाम गाळणारी कष्ट उपसणारी माणसे. या लुंग्यासुंग्यावर सत्ता गाजविणारे पुढारी आणि देव्हाऱ्यातले पुजारीही ! सतत शोषणाने गांजलेली प्रजाही बकालच !

'अशी आमुची फुरसुंगी–
त्रिखंडातली जिथे जन्मते जनता लुंगी सुंगी !'

ग. दि. माडगूळकरांची क्षमा मागून 'असे आमचे पुणे' च्या चालीवर लिहिलेले हे विडंबन काव्य खेड्यांच्या देशाचे आहे.

'लहान माझी भावली'च्या कर्त्याचे ऋण मानून बडबडगीताच्या चालीवर लोकशाहीच्या कारभाराचे भ्रष्टरूप दर्शविणारे आहे. बडबड गीतांना अर्थ नसतो पण चाल असते. लहान मुले त्या चालीनेच नादावतात. अर्थ कळाला नाही तरी - 'बडबड' गातात. त्या तालावर नाचतात. 'स्वातंत्र्य-समता-बंधुता' चा ढोल बडवीत लोकशाहीचे बडबडगीत दिवटे मंत्री झोंकात गातात, 'बेसूर' हीच त्या गीताची चाल !

'नियोजन केलं - कच्च झालं' (भात केला कच्चा राहिला !)

धरण केलं - वाहुन गेलं !' (वरण केलं करपुन गेलं !)

काहीच जमत नाही ! काहीही न जमणे यातच गम्मत !

दैन्य दारिद्र्य असूनही लोकशाही अमर आहे. कारण थंडगोळा जनता हे कोडगे अमरपण घेऊन जगतेच आहे. वर्षानुवर्षे तेच मतदान आणि तीच फसवणूक–

('आडाच पाणी काढायला गेले धपकन् पडले त्यात!' म्हणजेच)

'जगाला शहाणपण शिकवायला गेली सगळेच पडले दात. तोंडानं गरिबी हटवायला गेली, भूकबळी रस्त्यात!' अशी ही लोकशाही चिरायु आहे !

विकटकवी राजाचीही टोपी उडवू शकतो !

विदूषक विद्वान असतो म्हणूनच तो दर्जेदार विनोद करून रंजन करतो. सर्कशीतला विदूषक सर्कशीतल्या जीवघेण्या उंचच उंच झोक्यावर कसरत करण्याचे कौशल्य जाणून असतो. पण तो हेतुपुरस्सर पाय निसटून ओरडत वेडावाकडा खाली लावलेल्या जाळीत कोसळतो. आबाल वृद्धांची करमणूक करतो. दत्तो वामन पोतदारांच्या स्वभाव विशेषांवरील गमतीदार सुनीतात ते म्हणतात, 'दत्तो वामन पोतदार म्हणजे आहे पुराणा गडी!' सभेत झोपणारे-घोरणारे दत्तो वामन खरे की, त्याच सभेत विद्वत्तापूर्ण वक्तृत्वाने श्रोत्यांना मंत्रमुग्ध करणारे दत्तो वामन खरे ? असा प्रश्न, सुनीतकाव्याच्या शेवटी विकटकवीला पडतो. माणसांची दोन रूपे असतातच. जोगळेकरांच्या सहवासात मला नेहमी हाच प्रश्न पडायचा की व्याकरण-भाषा-वैज्ञानिक जोगळेकरसर खरे की, बिरबल-तेनालीरामाशी नाते जोडणारे विकटकवी जोगळेकर खरे ?

-सु. र. कुलकर्णी

संपादक

### उल्लेखनीय कार्य

*ठाण्याचे ॲड. शांताराम दातार यांनी न्यायालयाचे कामकाज मराठीतून चालावे म्हणून धरणे, उपोषण इत्यादी प्रकारे आंदोलन केले. त्यास शासनाने सकारात्मक प्रतिसाद दिला आहे. कनिष्ठस्तर न्यायालयाचे कामकाज आता मराठी भाषेतून सुरू झाले आहे. या कार्याबद्दल ॲड. शांताराम दातार यांचे अभिनंदन !*

*- संपादक मंडळ*

### एक निवेदन

*म.सा.परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर, ज्येष्ठ समीक्षक डॉ. सरोजिनी वैद्य, विश्वस्त न्या. बेहेरे आणि ज्येष्ठ प्रकाशक-संपादक श्री. पु. भागवत यांच्या निधनाने म. सा. पत्रिकेच्या या अंकाच्या नियोजित स्वरूपात ऐनवेळी बदल करावे लागले; त्यामुळे अंक प्रकाशनास थोडा विलंब झाला आहे. कृपया नोंद घ्यावी, आणि सहकार्य करावे ही विनंती.*

*- संपादक मंडळ*



अनुक्रमणिका

# निरोपाची लावणी !

**पराग गंगाधर जोगळेकर**



पंधरा ऑगस्टला सकाळी दारात पडलेले वृत्तपत्र माझ्या धाकट्या मुलानं उचललं आणि विचारलं की, ''गंगा-आजोबा कुठायत ?'' मी काहीबाही सांगूनही त्याचं समाधान होईना. शेवटी सांगितलं की, परिषदेत गेले आहेत; तेव्हा त्याचं समाधान झालं. तोच काय, काही वर्षांपूर्वी माझा मोठा मुलगाही धावून धावून फोन घेऊ लागल्यावर बाबांसाठी फोन असेल आणि बाबा घरात नसतील तर सरळ ''आजोबा परिषदेत गेले आहेत'' असं सांगून मोकळा व्हायचा. तसं आमच्या घरानं त्यांना घरासाठी कमी आणि इतरांसाठीच जास्त असं धरलं होतं; निवृत्त होण्यापूर्वी तर त्यांच्या वेळेत परिषदेशिवाय डे.ए. सोसायटी, फर्गसन, विद्यापीठ, मराठी अभ्यास परिषद, दूरशिक्षण या आणि अशा अनेकांचा वाटा असायचा. तरी अलिकडे त्यांच्या जास्त वेळ घरी असण्याची आम्हाला सवय व्हायला लागली होती...

तसं त्यांचं घराकडे फार लक्ष होतं असं नाही म्हणता येणार. खरं तर त्यांच्या यादीत घर आणि घरातल्या व्यक्ती शेवटी असत. त्यांनी घरासाठी किंवा घरातल्या कोणासाठी आपल्या वजनाचा वापर केला असं क्वचितच झालं. अगदी आम्ही राहायचो तो कौलारू बंगला अनेक ठिकाणी गळायचा. पावसाळ्यानंतर कौलातून सुरवंट पडायचे. तरी कौलांच्या दुरुस्तीस फार खर्च येतो म्हणून डे. ए. सोसायटीकडे त्यांनी कधी तक्रार केली नाही. सुरवंटांपासून वाचण्यासाठी आम्ही मच्छरदाण्यांत झोपायचो !

आम्ही नवीन मराठी शाळेत असताना पाटीपूजनाच्या दिवशी आम्हाला बाबा पाटीवर वीणावादिनी सरस्वतीचं चित्र काढून देत. इतर मुलांच्या पाट्यांवर १११११ ची सरस्वती असे. आमच्या पाटीवर मात्र खरंखुरं चित्र असे. त्यांची चित्रकला जशी छान होती तसंच त्यांचं अक्षरही सुंदर होतं. आमच्या घरच्या पत्रपेटीवर लिहिलेलं नाव त्यांनी स्वतःच थेट तैलरंग व ब्रशने लिहिले आहे. सुहृद व सुस्वन यांच्या बारशांच्यासाठी त्यांची नावं बाबांनीच थर्माकोलवर आखून दिली होती.

मला त्यांनी स्वतःच चौथीच्या सुटीत टिळक तलावावर नेऊन पोहायला शिकवले होते. ताईला व मला आधी सायकल नंतर दुचाकी शिकविली होती. आईच्या शब्दात मी बाबांचा लाडोबा होतो. अगदी लहानपणची एक गोष्ट मला अजून आठवते आहे. मी बाबांच्या छातीवर बसायचो आणि त्यांच्या पोटावर दोन्ही हात आपटून 'हा माझा नगारा आहे ढुम् ढुम् ढुम्' असं कितीतरी वेळा करायचो. त्यांनी कधी उचलून घेतलंय, जवळ घेऊन मुके घेतलेत असं नव्हतं. पण त्यांनी त्यांच्या दोन्ही पावलांवर उभं करून 'चाली चाली' केल्याचं मात्र आठवतं. त्यांनी आमचा शेजारी बसवून 'अभ्यास घेणं' वगैरे कधी केले नाही. पण काही अडलं तर ते नक्कीच सांगत. एखादा निबंध कसा लिहावा ते समजत नसेल तर त्यासाठी ते मुद्दे सांगत व ते मुद्दे येतील अशी मांडणी करायला सांगत. आमच्या शिक्षणासाठी किंवा शैक्षणिक बाबींसाठी खर्च करायला त्यांनी कधीच मागेपुढे केले नाही. जशी आमच्याकडे कित्येक वृत्तपत्रे यायची तसा आमच्यासाठी 'किशोर' यायचाच. त्यांना स्वतःला वाचनाची अत्यंत आवड होती व ते आम्हालाही वाचायला उद्युक्त करत. ते नुसतं वाचतच नसत, तर चांगलं लक्षातही ठेवत असत. कोणी साहित्यिक गेल्यावर पत्रकारांनी अगदी अपरात्रीही फोन करावेत आणि बाबांनी तत्क्षणी हवी ती माहिती तपशीलांसह द्यावी असं कित्येकदा झालं आहे.

कविवर्य वसंत बापट यांची निरोपाची लावणी बाबांना विशेष आवडायची. त्यांनी बापटांच्या

पान क्र. १७ वर पहा

# आठवणीतले जोगळेकरसर

वसुंधरा पेंडसे-नाईक

घरातील वडीलधारी व्यक्ती अनपेक्षितपणे गेल्यावर येणारा पोरकेपणा गेले काही दिवस जाणवतो आहे. केवळ मलाच नव्हे, तर डॉ. गं. ना. जोगळेकर या भारदस्त व्यक्तिमत्त्वाच्या सहवासात आलेल्या अनेकांना. आपले वय कितीही वाढले तरी आपल्या निकटवर्तियांचे जाणे एक असह्य चटका देऊनच जाते परंतु त्यामुळे पोरकेपणा येत नाही. तो येतो वडीलधाऱ्या व्यक्तीच्या जाण्याने. वडीलधारेपणा केवळ वयावर अवलंबून नसतो, वडीलधारेपणा ही वृत्ती असते. इतरांना आपला आधार वाटावा, आपल्यावर खात्रीने अवलंबून राहता यावे अशी. जोगळेकरसर हे या वृत्तीचे मूर्तिमंत उदाहरण होते. सरांशी महिन्याभरात एकदोनदाच फोनवरून बोलणे होत असे पण मनात एक विश्वास सतत जागता असे की कधीही गरज लागली तर सर आहेत. मराठी साहित्यापासून अ.भा.म.सा. महामंडळाच्या घटनेतील तपशिलापर्यंत कुठलाही संदर्भ हवा असला, एखाद्या विषयाबाबत मार्गदर्शन हवे असले, वैयक्तिक बाबींविषयी सल्ला हवा असला तरी सरांना नुसता फोन केला की इच्छित गोष्ट मिळेल ही खात्री होती. सरांचे असणे हा केवढा मोठा दिलासा होता, आधार होता हे आता लक्षात येत आहे !

प्रथमदर्शनी अतिशय गंभीर आणि तटस्थ वाटणाऱ्या सरांविषयी आदरयुक्त दरारा निर्माण होई. खरे तर धाकच वाटे. सरांनी बोलायला प्रारंभ केला की हा दरारा अधिकच वाढे. सरांचा भरदार आवाज, स्पष्ट शब्दोच्चार आणि दोन शब्दोच्चारांमध्ये राखलेले योग्य अंतर यामुळे त्यांचे बोलणे ठाशीव असे, विधाने ठाम असत. कुठेही संदिग्धता नसे की गुळमुळीतपणा नसे. 'योग्य असेल ते बोलणार आणि इष्ट असेल ते करणार' हा स्वच्छ दृष्टिकोन. हा ठामपणा आला होता ते उत्तम स्मरणशक्ती, अखंड अभ्यास आणि तर्कशुद्ध विचारपद्धती यांच्या मिलाफातून.

सन, तारखा, पुस्तकांची आणि लेखकांची नावे, साहित्यिक वाद इथपासून आणि आणखीही बरीच माहिती या मानवी संगणकात साठविलेली होती. या आश्चर्यकारक स्मरणशक्तीमुळेच प्राध्यापक, विभागप्रमुख, प्राचार्य या पदांवर असताना सहवासात आलेल्या शेकडो विद्यार्थ्यांची, सहकाऱ्यांची नावे त्यांच्या जिव्हाग्री होती. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या विविध शाखांतील अगदी तरुण कार्यकर्त्यांचीही नावानिशी ओळख सरांना होती ती या स्मरणशक्तीमुळे.

मराठीची प्राध्यापकी संपून दशकभराचा काळ लोटलेला असूनही सरांचे वाचन अद्ययावत् होते, याची विशेष नोंद घ्यायला हवी. कारण अशी उदाहरणे आता अपवादात्मकच म्हणायला हवीत. ललित वाङ्मयापासून समीक्षेपर्यंत आणि काव्यापासून क्रीडेपर्यंत सर्व विषयांवरची पुस्तके सर केवळ वाचत नव्हते तर त्यांचा विश्लेषक अभ्यासही करीत होते. नव्यांना समजून घेण्याचा प्रयत्न करीत होते. जिथे योग्य वाटेल तिथे प्रोत्साहन देत होते. नियतकालिकांचे त्यांचे वाचनही नियमित होते.

तर्कशुद्ध विचार करण्याच्या सरांच्या पद्धतीची ओळख त्यांच्यांशी बोलायला प्रारंभ केल्यापासून दहा-बारा मिनिटांमध्येच पटत असे. भावनेच्या आहारी न जाता, अत्यंत शांतपणे विषयाची चिरफाड करून, सर्व बाजूंचा अभ्यास करून, पूर्वी घडलेल्याचा संदर्भ पाहून आणि पुढे घडणारे परिणाम ओळखून सर निर्णयापर्यंत पोचत असत. समीक्षात्मक लेखन असो, मराठी वाङ्मयाचा इतिहास असो, वा मराठी भाषेचा इतिहास असो, त्यात तर्कशुद्धतेलाच सरांनी प्राधान्य दिलेले दिसते. अ.भा.म.सा. महामंडळाच्या बैठकीतही या तर्कशुद्धतेचा अनुभव यायचा. चौफेर व्यासंग, उत्कृष्ट स्मरणशक्ती आणि बारकावे टिपणारी सूक्ष्म नजर यामुळे इतरांना न दिसलेल्या उणीवा किंवा त्रुटी त्यांच्या लक्षात येत आणि त्या दूर करण्याचा आग्रह ते धरीत. विषयाचा सर्वांगीण विचार करून, सर्व तपशील तपासून, पूर्वेइतिहास, परंपरा लक्षात घेऊन सर आपले मत महामंडळाच्या बैठकांमध्ये मांडीत आणि त्यावर ठाम राहात. त्यावर कितीही विरोधी



अनुक्रमणिका

सूर उमटले, टीका झाली तरी सर अविचल असत. कारण निरपेक्षपणे आणि निःस्वार्थीपणे महामंडळाच्या हिताचा विचार करूनच त्यांनी आपले मत घडविलेले असे. महामंडळातील सर्वात ज्येष्ठ आणि अनुभवसंपन्न सदस्य म्हणून त्यांनी महामंडळाला नेहमीच मार्गदर्शन केले. कुणाला ते पटले नाही आणि ते धुडकावून निर्णय घेतले गेले तर सरांनी तो वैयक्तिक अपमान मानला नाही. परंतु महामंडळाच्या हानीची खंत मात्र बाळगली.

नव्या कार्यकर्त्यांमधील गुण नेमके हेरणारी नजर सरांना लाभली होती. नव्यांना प्रोत्साहन देणे आणि त्यांच्या पाठीशी उभे राहून काम करण्याची उमेद देणे हे काम सरांनी महाराष्ट्र साहित्य परिषदेत आणि महामंडळांतही आवर्जून केले. केवळ शाब्दिक पाठिंबा देऊन थांबणे, विहिरीच्या काठावर बसून बुडणाऱ्याला उपदेश करणे हा सरांचा स्वभावच नव्हता. ते स्वतःच पुढे होऊन कामाला लागत आणि मग इतर मंडळी त्यांच्या मदतीला येत. कुणी नाही मदतीला आला तरी हरकत नसे, सर एकटेच काम पूर्ण करून टाकीत !

महामंडळाचे अध्यक्षपद मुंबई मराठी साहित्य संघाने माझ्याकडे सोपवल्यावर दोन व्यक्तींचे मला सतत मार्गदर्शन लाभले - डॉ. बाळ भालेराव आणि डॉ. गं. ना. जोगळेकर यांचे. कुठलीही शंका त्यांना मी निःसंकोचपणे विचारीत असे, सल्ला मागत असे. जोगळेकरसरांनी महाकोषाची कल्पना उचलून धरली, स्वतःची देणगी तर दिलीच पण पुण्यातील काही साहित्यिकांच्या देणग्याही आणून दिल्या. विश्वस्तांच्या बैठकांमध्ये अनेक व्यवहार्य सूचना केल्या. मुंबई, बेळगाव आणि इंदूर या माझ्या कार्यकाळातील तिन्ही संमेलनांना सरांचे मोलाचे सहकार्य लाभले.

मराठी भाषेवर आणि महाराष्ट्राच्या मातीवर सरांचे नितांत प्रेम होते म्हणूनच राज्य मराठी विकास संस्थेच्या प्रारंभापासून संस्थेबद्दल आस्था होती. डॉ. सरोजनी वैद्य यांनी 'अर्वाचीन महाराष्ट्राची जडणघडण' या मालिकेसाठी महाराष्ट्र साहित्य परिषदेवरील पुस्तक लिहिण्याची जबाबदारी श्री. म. श्री. दीक्षितांवर सोपविली होती. जोगळेकरसरांनी दीक्षितांना आवश्यक ते सर्व सहकार्य केले होते. मराठीची वर्णमाला, वर्णलिपी, शुद्धलेखनाचे नियम यांचा पुनर्विचार होणे, मराठी संगणक कळफलकाच्या प्रमाणीकरणासाठी आवश्यक असल्याने राज्य मराठी विकास संस्था व अ.भा. मराठी साहित्य महामंडळाने एकत्रितपणे हे काम केले. त्यासाठीच्या प्रत्येक बैठकीत भाषातज्ज्ञ म्हणून सरांनी अनेक मौलिक सूचना केल्या होत्या. २००१-२००४ या काळात राज्य मराठी विकास संस्थेच्या नियामक मंडळाचे सदस्य म्हणूनही सरांनी अतिशय आस्थेने काम केले होते. दि. ३ ऑगस्टला संस्थेच्या पहिल्या संचालक, ज्यांनी संस्था घडविली, वाढविली, जोपासली त्या डॉ. सरोजिनी वैद्य गेल्या, दि. १४ ऑगस्टला जोगळेकरसर गेले आणि दि. २१ ऑगस्टला प्रा. श्री. पु. भागवत गेले. संस्थेच्या आराखडा आखणीपासून पहिल्या नियामक मंडळातील सदस्यत्वापर्यंत श्री. पु. भागवतसरांचा संस्थेत सहभाग होता. या तिघांचे एकापाठोपाठ जाणे ही दुर्दैवी वस्तुस्थिती आहे. परंतु संस्थेला निरपेक्ष आणि आस्थापूर्वक मार्गदर्शन करणाऱ्या या तिघांचे नसणे पचविणे फार जड जाणार आहे.

महाराष्ट्राच्या सीमाप्रश्नांचा गुंता सुटावा आणि महाराष्ट्रात सीमाभाग समाविष्ट व्हावा यासाठी सर सतत प्रयत्नशील होते. सीमावासीयांच्या अडचणींची त्यांना नेमकी जाण होती. सीमाप्रश्न समजावून सांगणारी पुस्तिकाही त्यांनी तयार केली होती. प्रत्येक साहित्यसंमेलनात सीमाप्रश्न लवकर सोडवून सीमावासीयांना न्याय देण्याचा ठराव सर महामंडळाच्या आणि विषयनियामक समितीच्या बैठकीत आवर्जून मांडत असत. बेळगावच्या साहित्य संमेलनात तर या ठरावाचा विस्तृत मसुदा सरांनी अतिशय नेमकेपणाने लिहिला होता. २००० साली संमेलन पार पडल्यावर, मुंबईमध्ये मुंबई मराठी पत्रकार संघासह आझाद मैदानावर संयुक्तपणे आयोजित केलेल्या धरण्यातही सरांनी उत्साहाने भाग घेतला होता. या संमेलनात निर्माण केलेल्या 'पाठपुरावा समिती'मध्ये डॉ. य. दि. फडके, श्री. नरसिंगराव पाटील, राजाभाऊ माने, न्या. नरेंद्र चपळगावकर, जोगळेकर सर आणि मी यांचा समावेश होता. शासनाबरोबर झालेल्या या समितीच्या तिन्ही बैठकांमध्ये मुख्यमंत्री विलासराव देशमुख आणि विद्यमान केंद्रीय कृषीमंत्री श्री. शरदराव





अनुक्रमणिका

पवार यांना महाराष्ट्राच्यावतीने न्यायालयात मांडण्यासाठी अनेक मुद्दे अतिशय कळकळीने सरांनी सुचविले होते.

सरांचे काटेकोर वागणे, करडी शिस्त, वक्तशीरपणा, सडेतोड बोलणे, त्यांना भेटणाऱ्यांच्या लगेच लक्षात येई. परंतु दुसऱ्याला आपल्याकडून त्रास होऊ नये म्हणून घेतलेली खबरदारी, स्वतः जातीने कामे करण्याची तत्परता, 'आधी केले मग सांगितले' हे अंगिकारलेले तत्त्व या गोष्टी सरांचा अधिक परिचय झाल्यावरच जाणवायच्या. महामंडळाच्या नियामक मंडळ सदस्यांनी, संमेलनातील आपला प्रतीकात्मक आर्थिक सहभाग नोंदविण्यासाठी, संमेलनाच्या स्वागतसमितीचे सदस्यत्व स्वीकारावे का अशी एक चर्चा सन २००२ च्या पुणे येथील संमेलनापूर्वीच्या बैठकीत झाली होती. त्यानंतरच्या सर्व संमेलनांमध्ये सरांनी स्वागत समितीचे सदस्यत्व रु. १०००- भरून घेतले होते. ही बाब पूर्णतः ऐच्छिक होती. रक्कम हजाराची असली तरी त्यामागची सहकार्याची भावना मोलाची होती, सरांचा दृष्टिकोन स्पष्ट करणारी होती. आपल्याकडून दुसऱ्यासाठी जे जे करणे शक्य असेल ते ते सर अगत्याने करीत आणि मुख्य म्हणजे त्याची जाहीर वाच्यता करीत नसत.

सर गुणग्राहक होते. माणसांची अचूक पारख करणारे होते आणि रसिकही होते. उत्तम कवितेला दिलखुलास दाद देणारे सर साहित्यसंमेलनातील नव्या दमाच्या, उगवत्या कवींच्या काव्यवाचनाला (निरंजन उजगरे यांनी आयोजित करण्याचा प्रारंभ केला त्या 'उगवतीचे रंग' या कार्यक्रमाला) हमखास उपस्थित राहात. अनेकांना हे ऐकून नवल वाटेल की सरांनी कविता लिहिल्या होत्या, उत्तम विडंबनकाव्ये रचली होती. इंदूरच्या संमेलनाच्यावेळी एकदा गप्पा मारताना, आम्ही महामंडळातील सहकाऱ्यांनी आग्रह केल्यावर त्यांनी काही विडंबने म्हणून दाखविली होती आणि त्यातील मार्मिक विनोदाने आम्हाला बराच वेळ हसविले होते.

सरांच्या एका अगदी वेगळ्या पैलूचा उल्लेख केल्यावाचून राहवत नाही. 'हिंदी चित्रपट' हा सरांच्या खास जिव्हाळ्याचा विषय ! गेल्या ५-६ दशकातील कुठलेही हिंदी चित्रपटगीत कुणी लिहिले, कुणी त्याला संगीत दिले, कुणी ते गायले, कुणावर चित्रित झाले, त्याचा दिग्दर्शक कोण हा सारा तपशील सर एका दमात सांगत असत. त्यांच्या मनातला एक खास कप्पा शास्त्रीय संगीत आणि चित्रपटगीते यांसाठी राखून ठेवलेला होता.

इंदूरच्या साहित्यसंमेलनाहून परत येताना रेल्वेच्या डब्यात एक सुरेख मैफल जमली होती. संजीव आणि शुभांगी लाटकर, सारंग दर्शने, उदय तानपाठक वगैरे पत्रकारमंडळी, प्रा. सुहासिनी कीर्तिकर, मी, जोगळेकर सर, श्री. राम गबाळे आणि डॉ. श्रीराम पुजारी असे एकत्र जमलो होतो. सरांनी फर्माईश करायची आणि डॉ. श्रीराम पुजारींनी लगेच आपल्या गायकीने ती पेश करायची असा प्रकार २-३ तास चालला होता. त्यातच राम गबाळे आणि उदय तानपाठक यांचे विनोदी किस्से-कथन, सरांचे विडंबनकाव्य म्हणणे असा जोरदार कार्यक्रम झाला. सरांनीही अनेक किस्से ऐकविले. साऱ्या डब्यातील प्रवासीमंडळी कोंडाळे करून, दाटीवाटीने या कार्यक्रमाचा मनसोक्त आस्वाद घेत होती. तेव्हांचे सरांचे ते वेगळे रूप, ते खळखळून हसणे, डॉ. पुजारीच्या दमदार तानांना दिलखुलास दाद देणे सदैव स्मरणात राहील.

एखादी व्यक्ती ही संस्था होती असे आपण म्हणतो आणि ते खरेही असते. त्यामुळे त्या एका व्यक्तीच्या जाण्याने वेगवेगळ्या कामांची गती मंदावते किंवा दिशा बदलते, नवीन आखणी खोळंबते. महाराष्ट्र साहित्य परिषद आणि अ.भा.मराठी साहित्य महामंडळ यांना स्वतःच संस्था असलेले जोगळेकरसर आता नसल्यामुळे बऱ्याच कामांची फेरआखणी करावी लागेल. महाराष्ट्र साहित्य परिषदेची जबाबदारी ३० वर्षे सांभाळणारे जोगळेकर सर त्यांच्या कार्यालयातील विशिष्ट खुर्चीवर बसलेले नाहीत या गोष्टीची आता सर्वांनाच सवय करून घ्यावी लागणार आहे. इथे सरांना आवडणाऱ्या हिंदी चित्रपटगीताची नेमकी आठवण झाली.

अगर जाऐ चला माली, चमन होता नही खाली।<br>
बहारें फिर भी आती है, बरहारें फिर भी आएगी ॥

निसर्गक्रमाने झाडांना पालवी फुटेल, बहर येईल. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या बहरामध्ये मात्र सरांनी केलेल्या मशागतीचा वाटा सदैव फार मोठा असेल.

**सौ. वसुंधरा पेंडसे-नाईक**<br>
ए/१, मोती मॅन्शन, खेतवाडी, मेन रोड, मुंबई - ४०००0४.

# साहित्य-सहकार !

कोणत्याही विद्यार्थ्याशी सरांनी कधी 'गप्पा' मारल्या नाहीत. त्यांचा तो स्वभावही नव्हता; पण प्रत्येक विद्यार्थ्याची अचूक माहिती त्यांच्याकडे होती. विद्यार्थ्यांनाही सरांबद्दल आदरयुक्त भीती होती. विद्यार्थ्यांना प्रोत्साहन देण्यासाठी साहित्य-सहकार सरांनी नेटाने चालविले, 'आशय' हे भित्तीपत्रक. दर शुक्रवारी एम.ए. भाग दोनच्या एका विद्यार्थ्याने पेपर सादर केलाच पाहिजे; आणि त्यावर चर्चा झालीच पाहिजे, याबाबत त्यांचा कटाक्ष असे या चर्चेतून अनेक मुद्दे उपस्थित होत असत, विद्यार्थ्यांचा आत्मविश्वास वाढत असे, अभ्यासाव्यतिरिक्त नवीन विषय हाताळला जाई, वाचन त्यानिमित्ताने होई. अशा किती अप्रत्यक्ष पण चांगल्या गोष्टी, उपक्रम सरांनी आमच्याकडून करवून घेतले. या पेपर वाचनाच्या चर्चेचा शेवट, सर करीत. अनेक नवीन मुद्दे, न आलेले संदर्भ, कशा पद्धतीने मांडणी हवी. यासंबंधी मार्गदर्शन करीत आणि अभ्यास कसा असावा याचा पाया मजबूत करून घेत.

एक विद्यार्थिनी म्हणून जर मला विचारलं की सरांचं तुमच्या मनातलं स्थान काय ? तर आई-वडिलांइतकंच म्हटल्यास अतिशयोक्ती ठरणार नाही. म्हणूनच सर नाहीत म्हणजे एक छत्र हरपल्याची सारखी जाणीव होत आहे. फर्ग्युसनमध्ये डॉ. अ. वा. कुलकर्णी आणि डॉ. गं. ना. जोगळेकर हे विद्यार्थांसाठी आवडते शिक्षक होते. डॉ. अ. वा. कुलकर्णी गेल्यावरही खूप अस्वस्थता आली होती. तेव्हा सरांनी त्यांच्या आम्हाला माहीत नसलेल्या आठवणी सांगितल्या आणि दुःख हलकं केलं. पण आता सरांनंतर कोण ?

**सुजाता शेणई**

# इथेही बाईच्या नशिबी चूल !

एरव्ही समीक्षकी चेहरा लाभलेले गंन्रा (ही कदाचित् आमच्या नजरेची चूक असेल.) टिपण्या केल्या तर हसत स्वीकारत. औरंगाबादच्या संमेलनात त्यांची गाठ जेवणाच्या हॉलच्या दारात पडली. वरच्या पाटीकडे बोट दाखवत (भोजनगृहाला संत कवयित्री महदंबाचे नाव दिले होते.) मी म्हटले "काय सर, इथेही बाईच्या नशिबी चूलच का ?"

मी जीभ चावेपर्यंत ते खिलाडूपणे उत्तरले, "होय, झाले तसे हे खरेच, पण इथल्या कमिटीनेच आग्रह धरला, आम्ही मग ढवळाढवळ केली नाही." त्यावेळी ते महामंडळाचे अध्यक्ष असल्याने दुसऱ्या दिवशी वर्तमानपत्रात त्याची चौकटीतली बातमी झाली. पुढे मसापचा लेखिका पुरस्कार मिळाला तेव्हा सोबतच्या माहितीपत्रकात 'जन्मतारीख' लिहायचा चौकोन होता. मी उत्तरात विचारलेले फारसे आवडत नसावे." 'वय' लक्षात घेऊन पुरस्कार देत नसताना हा चौकोन कशाला हवा." त्यांनी मग केव्हातरी तो चौकोन काढला असावा कारण विज्ञानविशेषांकासाठी त्यांनी स्वतःच माहिती लिहून पाठवा म्हटले त्यात जन्मतारखेचा उल्लेख नव्हता. मे अखेरी मसापच्या वार्षिकोत्सवात त्यांची भेट झाली. हा कार्यक्रम अगदी मसापने कात टाकावी असा झोकदार झाला. नंतरचा प्रेमकविताचा कार्यक्रमही छान झाला. पुरस्कार घेताना इतका सुंदर चौघडा वाजत होता की प्रत्येक येणारा जाणारा आपोआप तालात पावले टाकत येत जात होता. मी सरांजवळ जाऊन त्याबद्दल हसत म्हटले, "शंभरी नंतर मसाप पुन्हा तरुण होऊ लागलीय." तेव्हा ते उत्तरले, "आता पुढे पहालच खूप नव्या योजना आहेत. उद्या ऑफीसात येऊन नियोजित इमारतीचा आराखडा पहा."

मसापचे चारी बाजुने मोठे होणे हीच सरांना खरी श्रद्धांजली ठरेल. बाकी त्यांच्या विद्यार्थ्यांच्या, आमच्यासारख्या परिचितांच्या स्मृतीत त्यांच्या आठवणी राहणारच !

कुणाचे कितपत अन् कसे ऋणानुबंध जुळावेत हे कोण कसे ठरवते कुणास ठाऊक !

**प्रा. माधुरी शानभाग**

# बिनसाखरेचा चहा

## मो. गो. धडफळे

आम्हा दोघांचे ज्येष्ठ सहकारी मित्र प्रा. नानासाहेब परळीकर यांच्या मेघदूतावरील एका 'पावसाळी' व्याख्यानाला आम्ही दोघेही गेलो होतो. सभागृहापासून रिक्षा मिळेपर्यंत चालत निघालो. गंनाची चाल माझ्यापेक्षाही अधिक मंद झाली होती. रिक्षात गप्पा काही रंगत नव्हत्या. अधूनमधून गंना हरवल्यासारखाही व्हायचा. एकदा तर तो चक्क संदर्भरहित असंच बोलला. त्याला मध्यंतरी बरं नव्हतं, तो बेशुद्ध पडला होता. उदयनं त्याला तत्परतेने जोशी हॉस्पिटलमध्ये दाखल करून काही काळ, तपासण्या व विश्रांतीसाठी ठेवलं होतं हे सारं त्यानं मला सांगितलं. अखेर अलंकार पोलिस चौकी हे मुख्य खुणेचं ठिकाण आलं. रिक्षा चालकाला स्वतःच्या घराची नेमकी गल्ली जोगळेकर सांगू शकला नाही. दाट अंधारात दोन उलट्या सुटल्या चकरा माराव्या लागल्या आणि जोगळेकरला नाही तर मलाच 'सदिच्छा' २२, मनीषा सोसायटी, हा गंनाचा बंगला ओळखता आला. रिक्षा थांबली. एक चकार शब्दही न बोलता माझा घरात शिरला. हरवल्यासारखं होणं काय, विसरणं काय, विसंगत बोलणं काय ? आणि हे सगळं स्मृतीचं आगर असणाऱ्या नेमकं, नीटस बोलणाऱ्या आमच्या गंनाबाबत घडावं ! मला वाटतं जो धक्का मला बसायचा तो त्याचवेळी बसला; उदयनं दिलेल्या माहितीनं त्याची पुनरावृत्ती झाली नाही. एखाद्यानं खूप उत्साहानं एखादा विनोद सांगावा, गंनानं त्यावर अजिबात न हसता 'या विनोदाला दोन महिन्यांपूर्वीच माझं हसून झालं आहे' असं म्हणावं तसाच काहीसा धक्का न बसणं हा प्रकार झाला असावा. फरक एवढाच की विनोदाच्या जागी शोकवृत्त व न हसण्याच्या जागी न धक्का बसणं. रा. शं. वाळिंबेसरांच्या नंतर ज्याचं वर्णन 'स्मृतीचा आगर' असं करावं तो फक्त जोगळेकरच. ''जोगळेकर सर, पहिलं साहित्यसंमेलन कुठं भरवलं गेलं; आणि त्या संमेलनाचे अध्यक्ष कोण होतं ?'' एवढं विचारावं की लागलीच खुर्चीवर थोडं मागे रेलून, डोक्यामागे तळहाताची बोटं एकमेकांत गुंतवून सन्मित्र म्हणायचा, ''सांगतो की...'' आणि मग अस्खलितपणानं पहिल्या ते आजवरच्या झाडून सगळ्या संमेलनांची गावं आणि अध्यक्षांची नावं पाढे म्हणावेत तसं सांगितली जायची. एकूण काय तर रा. शं. वाळिंबे यांच्यापेक्षाही अधिक संपन्न असं स्मृतिभांडार असणारा आमचा मित्र स्वतःच्या घराची गल्ली ओळखू शकला नाही हे काही 'खरं' नव्हतं. मधुमेहानं त्याला पुरतं पोखरून काढलं होतं आणि याच राक्षसानं पहिला अन् शेवटला असा एकच घातक स्वरुपाचा हृदयाचा झटका देऊन गंनाला आपल्यातून कायमचं दूर नेलं होतं. 'गंनानं स्वतःची काळजी घ्यायला पाहिजे होती.' असलं काही म्हणायचा अधिकार तरी आहे का आपल्याला ? पीळदार शरीर, कणखर वृत्ती, शिवसंकल्पी मन, साधी रहाणी या साऱ्या गुणसंचयाचं नाव म्हणजे गं. ना. जोगळेकर. गंनानं आयुष्यात सिगारेट सोडली ती कायमचीच, मांसाहार वर्ज्य नव्हता पण तोही कधीमधी आणि बेताचाचं. देवही विचित्रच म्हणायचा ! आमच्या वामनरावला (हिंदीचे वा. ह. जोशी) पथ्य म्हणून कशाची शिफारस ? तर सकाळी उठून पेढे-बर्फी खायची. आमच्या गंनाची आवड म्हणायची तर आईस्क्रीम अन् बासुंदी, पण कसलं आईस्क्रीम अन् कुठली बासुंदी ? बिन साखरेचा चहा नशिबी आला, पण तोही आनंदानं 'सुर्रर करून' प्यायचा, ''आम्हाला वरून साखर घ्यावी लागत नाही; आम्ही मुळातच गोड'' असं म्हणत तो मनी असू देतसे स-मा-धा-न !

जोगळेकर जातीचा रसिक, गाण्यातले सारे काही बारकावे त्याला माहीत असायचे. माझ्या कसब्यातल्या घरी तो एकदा ''हे वदन तुझे की कमल निळे'' हे गाणं (एक सोडून) सर्व वहिनी समाजासमोर गायला होता. गुलाम अलीच्या स्वरात गोडवा असला तरी 'दरबारी-कानडा' सोडून तो फार काही करत नसतो अशी त्याची तक्रार होती. जोगळेकर कवी होता. खास करून







विडम्बनकार. 'अशी आमची फुरसुंगी', 'दत्तो वामन पोतदार म्हणजे खुर्चीमध्ये घोरणे' अशी अनेक हास्यगीतेही पंतांनी लिहिली. ते स्वतः अनेकदा वक्त्याची ओळख करून देऊन किंवा मालिकेचा परिचय करून देऊन खुर्चीत विसावले की 'रा. श्री. शैली'नं एक बोट चष्म्याच्या काचेखालून पापणीवर ठेवून काही क्षणांची सजग समाधी लावत असत. झोप सावध असायची.

सर्वच साहित्यप्रकारांवर जोगळेकरांचं प्रेम असलं तरी 'परि प्रीति तुजवरती' असं पुलंसारखेच कवितेवर प्रेम अधिक होतं. पुगंच्या संथ लयीचा आणि निबंधाचा प्रभाव चंद्रशेखर बर्व्यांच्या मांडणीवर स्पष्ट दिसतो. रा. शं. यांच्या शैलीचा भास 'हेर्वी'च्या बोलण्यात व्हायचा. गो. के. भटांपेक्षाही विजया राजाध्यक्षांची छाप मनीषा दीक्षितांवर अधिक दिसते. अरविंद कुलकर्णीमध्ये प्रथम प्रथम 'वालं'चे संस्कार आढळायचे (नंतर नाही). स. शि. व गं. ना. यांनी अनेकांना ऐकलं होतं. पण कोणाचाही गंडा कधी बांधून घेतला नाही. स्वतःचा स्वतंत्र विकासच या दोघांनी साधला.

साहित्य बंधु-सापेक्ष अशी समीक्षा : मराठीच्या बाबतीत काय अन् इतरही भाषांच्या बाबतीत काय, एकापरीचे समीक्षा-संप्रदाय आढळून येतात. सामाजिक बांधिलकी (राजकारण, समाजकारण, अर्थकारण, धर्मकारण) हा पुगंचा संप्रदाय तर एका बाजूला भरत-अभिनवगुप्त आणि दुसऱ्या बाजूला ॲरिस्टॉटल-रोमँरोलाँ, कामू अन् सार्त्र यांच्यातील अवतरणांनी सजलेली, नीतीमूल्याचा आग्रह धरणारी, विद्ग्धवृत्तीपर अशी रा. शं. यांची समीक्षा, श्रीकेक्षींचा सौंदर्यवाद, मर्ढेकरांचा नवसौंदर्यवाद, प्रभाकर पाध्ये यांचा पाटणकरी सौंदर्य-विश्लेषण-वाद, तर रा. श्री.चा पाश्चात्य समीक्षेचा परिचय करून घेऊनही जपलेला भारतीय अभिनवकाव्यप्रकाशवाद. जोगळेकरांनी अशा प्रकारची बंधने कधीच मानली नाहीत. साहित्य हे जर बहुंगी आणि बहुढंगी असेल तर एकांगी स्वरुपाची समीक्षा कशी समर्थनीय ठरेल ? या बहुनिकषप्रधान समीक्षेला पंडिती संज्ञा द्यायची तर 'विभज्यवादी समीक्षा' किंवा 'स्वयाद्वादी समीक्षा' (multiple criteria) असं नामकरण मी सुचवेन. कथा, कादंबरी, नाट्य व काव्य, चरित्र व आत्मचरित्र, प्रवास वर्णन आणि भूगोलपर निसर्गवर्णनं यांच्या साहित्यिक समीक्षेसाठी नानाविध निकषांची गरज असते. एखादा वैद्य अनेक बिया, वनस्पती इत्यादी एकत्र कुटून रुग्णाची प्रकृती आणि उद्‌भवलेली व्याधी लक्षात घेऊन औषध योजना करेल असंच समीक्षकानंही करायला हवं. जोगळेकरचा समीक्षेचा पल्लाही फार विस्तृत होता. चारोळ्या, वात्रटिका, हायकू, किंग्चित्काव्य, काव्यचित्कार इथंपासून ते पार खंडकाव्य अन् महाकाव्य इथपर्यंत तो अधिकारवाणीनं बोलत असे.

जुन्या पिढीतल्या संजीवनीबाई, बहिणाबाई, शांताबाई, इंदिराबाई, कुसुमावतीबाई, अनुराधाबाई, पद्माताई अशा बुजुर्गांबरोबरच साहित्यसहकारातील अरुणा ढेरे, शिवप्रिया सुर्वे, संजीवनी बोकील अशा तरुण पिढीच्या कवितांनाही प्रोत्साहन आणि मार्गदर्शन जोगळेकर देत असत. बाकी वृत्तबंध सांभाळून बऱ्यापैकी शब्दजुळणी करून विविध संस्थांच्या रौप्य-हीरक-शताब्दी अशा समारंभांसाठी 'मेन्यू' सांगितला की 'रसिके अक्षरे' नसली तरी अक्षर-रेसिपीज गंना व मी पुरवीत असू. गंना मराठी चवीची तर मी संस्कृत-प्राकृत (अभि) रुचीची कविता बनवीत असू. प्रतिभायुक्त कवीलाही उत्तम प्रकारची शब्दकळा ही अवगत असावी लागतेच. गंनालाही अगदी गदिमांच्या 'झुंजुरका' एवढा नसली तरी चांगल्यापैकी शब्दकळा साधता येत असे. आपले व्याही पारखे यांच्यासाठी मातृपूजा या उपक्रमासाठी गदिमा यांनाही बैठक मारून ''तुझ्या वंदितो माऊली पावलासी'' हे गेय कवन रचावंच लागलं, आणि आषाढाच्या पहिल्या दिवशी 'मेघदूत' सुचलं नसलं तरी मंगेश पाडगावकरांना लिज्जतदार पावसाळी गाणं स्फुरायचंच. 'पुण्यमयी दे आम्हा अक्षरवरदान' ही प्रार्थना मागणीनुसारच केली गेली. आमचे तर्कतीर्थतर उत्तम खतासारखं फलदायी कुजकेपणाचं 'काय छान कुचकं बोलू शकतो !' असंही कौतुक करायचे. अत्र्यांच्या लेखनाबाबत 'अश्लील लिहायला अन् बोलायलाही प्रतिभा लागते' असं मी म्हटल्यावर मी या दृष्टिकोणाचं सोदाहरण परिष्करण

करावं असं गंनानं मला सुचवलं. अनेक संकल्पांपैकी सिद्धीला न पोचलेला हा आणखी एक संकल्प.

स. शि. भावे आणि गं. ना. जोगळेकर या माझ्या दोन्ही मित्रांचा एक विशेष म्हणजे विचारातला व्यवस्थितपणा (Well - arranged intellect) आणि त्यामुळं लेखनात जाणवणारा सलग सुसूत्रपणा. एकदा सोसायटीच्या कामासाठी ॲम्बॅसिडर टॅक्सी काढून मी मुंबईला जाणार होतो. त्याच दिवशी भीमराव कुलकर्णी यांनी एका परिसंवादासाठी निबंधवाचन करण्यासाठी गं.नां.ना मुंबईला बोलावलं होतं. मी सकाळी ७॥ वाजता गाडी घेऊन येतो असा निरोप मित्रवर्यांना दिला. ते स्नान करून पायजमा व इस्त्रीचा मॅनिला घालून तयार होते. मी खुर्चीवर विसावतोय तोच वहिनींनी कांदा पोहे व चहा टी पॉयवर ठेवले. गंनांनी हातानंच 'सुरू करा' म्हणून खूण केली. टेबल लॅम्प लावला आणि स्वच्छ पांढऱ्या तावांवर झरझर मोठ्या अक्षरांत ते लिहू लागले. फक्त एकदाच हातातल्या बॉलपेनचं टोक वर होऊन कपाळावर रेषा दिसली. पंधरा मिनिटांच्या समाधीत लेखन पूर्ण झाले. टेबल लॅम्प विझवला गेला. खास जोगळेकरी नेसणीनुसार पायजम्यावर पॅन्ट चढवली गेली आणि माझा दंड धरून स्वयंपाकघराच्या दिशेने "आम्ही निघतो" असं म्हणून गंनांनी मला घराबाहेर काढलं. "वहिनी पोहे चांगले झाले होते"एवढं त्या साध्वीला म्हणण्याची उसंतही मला देण्यात आली नाही. किती वाजता निघायचं, हॉटेलात कोणते पदार्थ मागवायचे याचे आपले निर्णय गंनाच घ्यायचे.

गंना जमखिंडीचे, थोडक्यात चुकलं म्हणून बरं, नाही तर त्यांचं प्राथमिक व माध्यमिक शिक्षण कन्नड माध्यमातून झालं असतं. ते कन्नड सहजपणे वाचू शकत. बोललेलं त्यांना बहुतांशी कळायचं. 'चिठ्ठी'चा उच्चार त्यांच्याकडून 'चिट्टी' असा व्हायचा. कन्नड सम्पृक्त-उच्चारण-पद्धतीनं ते 'मूर्खपणा' यातलं दुसरं अक्षर स्वरान्त न म्हणता व्यञ्जनान्त उच्चारायचे "चांगला मूर्खपणा झाला." 'विषय' हा त्यांच्या तोंडचा शब्द माझ्या कानाला या 'विषियाचा' असा किंचित इकारयुक्त स्वरात ऐकू यायचा. पुरुषी आणि बायकी धाटणीचे मराठी या माझ्या कल्पना अजूनही फारशा बदलल्या नाहीत. संगती किंवा मेळ नसणारं वक्तव्य कोणी केलं की गंना म्हणायचे "आता तुमच्या 'बोलण्यात बोलणं' कसं नाही ते पहा."

बाकी एकूण बोलायचं तर गडी खास मर्दानी. त्यांना भांडायचीही हौस होती. एकदा एका रिक्षावाल्याशी त्यांनी बरीच हुज्जत घातली आणि वर मला म्हणाले, "जरा तोंडाची वाबळ जाते." गंना मनाचा विलक्षण कणखर होता. क्वचित् फटकळ, तुटक, तोडून बोलणारा. रंगा मराठे एकदा सांगत होते, "कोणीतरी एक माणूस बुटाची लेस बांधायला खाली वाकला आणि जो कोसळला तो पुन्हा काही उठलाच नाही." यावर गंनांची टिपणी "तुला तर लेस बांधायचीही वेळ येणार नाही." कल्याणीताई दिवेकर यांना मी लालबहादूर शास्त्री मार्गाजवळच्या रामबागेत फ्लॅट घेण्याचं कारण सांगत होतो. "मला व्याख्यानं ऐकायला आवडतात. इथून मसाप, भाइसं, टिस्मा, सप, सगळंच जवळ पडतं." यावर जोगळेकरांची शुभवाणी. "हो आणि वैकुंठही अगदी जवळच्या जवळ !" माझा मित्र मनानं किती मृदू होता हे मला माहीत होत. बहुधा लहानपणी आईचं प्रेम फार लाभलं नाही की असं होत असावं. तिन्ही भावातलं कमी जास्त प्रमाणात हे खरं होतं. पण अडीअडचणीला दुसऱ्याला मदत करायला, प्रसंगी आर्थिक सहाय्य द्यायलाही जोगळेकर पुढे असायचा, डे.ए.सो. कडून निवृत्युत्तर लाभ म्हणून मिळणारे मासिक पाचशे रुपये मी न वापरता, त्यांचे त्यांना परत करणार आहे. असं एकदा मला म्हणाले होते. त्याच्या पायाला टॅक्सीनं धडक मारल्यानं जबर दुखापत झाली. हा प्रकार मुंबईत घडला, डे.ए.सो.च्या कचेरीचे रजिस्ट्रार श्री. दत्तोपंत वाघ त्यांच्याबरोबर होते. त्यांनी गंनांना फोर्टमधल्या एका इस्पितळात दाखल केलं. सहा-सात महिन्यांचं दुखणं निघालं. पुण्यात भिडे हॉस्पिटलमध्ये दोन वेळा शस्त्रक्रिया झाल्या. पण या सर्वातून निभावून 'पुनःश्च हरि ॐ' म्हणून जोगळेकर दोन्ही पायांवर सशक्तपणे उभे राहिले. काहीच दिवसात पुन्हा आपल्या खास जुन्या स्कूटरेटवर बसून सर्वत्र संचार करू लागले. माझ्या बाबतीत असा अपघाताचा प्रसंग आला असता तर मला नाही वाटत मी त्यातून सावरू शकलो असतो.

गंना पोलादी होता.

कविता करणं, गाणं म्हणवणं याबरोबरच नाटकं बसवणं व नाटकात काम करणं याही बाबतीत ते निपुण होते. आम्ही दोघं एम्.ए.ला एका वर्गात होतो. गंना मला एक वर्ष ज्युनियर. मी १९६१ साली फर्गसनमध्ये रूजू झालो तर गंना पुढीलवर्षी दाखल झाला. एम्.ए.च्या वेळी पुलंच "तुझं आहे तुजपाशी" मध्ये काकाजीची भूमिका त्यांनी उत्तम प्रकारे निभावली. त्या नाटकात नानासाहेब गोरे यांची मुलगी शुभा काम करीत असे. आम्हीही सगळे तिचा निर्देश 'नागकन्या' म्हणून करत असू.

घरच्या बऱ्या आर्थिक स्थितीमुळं माझं शिक्षण निर्वेधपणानं सलग झालं. गंनाला नोकरी करीत शिक्षण पूर्ण करावं लागलं. तो डे.ए.सोसायटीच्या सातारा न्यू इंग्लीश स्कूलमध्ये शिक्षक म्हणून नोकरीला लागला होता. याच न्यू इंग्लीश स्कूलचा विद्यार्थी म्हणजे आपला स. शि. भावे. भावे एकवेळचा विद्यार्थी, गंना एकवेळचा शिक्षक आणि मी तीन वर्षे शालासमितीचा अध्यक्ष. याच शाळेत आवळीकरांसारखे सहशिक्षक गंनांला लाभले. त्यांच्या विषयीचा दै. केसरीतला 'पंडितमैत्री' हा लेख माझ्या स्मृतीत आजही ताजा आहे. नावांवरील कोट्या हा गंनाचा आणखी एक विशेष. त्यांचा दृष्टिकोण न पटल्यानं काहीशा रागात श्रीमती सत्त्वशिला सामंत यांनी एका दैनिकात लेखन केलं. त्याला उत्तरादाखल लिहिलेल्या गंनाच्या पत्राचा मथळा होता"... विषयक 'सात्त्विक' संताप." फर्गसनच्या कचेरीतील एकवेळचे प्रमुख अधिकारी तपस्वी हे भजनादिक गायनाचे कार्यक्रम करीत असत. गंना त्यांना 'गानतपस्वी' म्हणत. आमच्या रसायनीच्या शाळेत असलेले एक शिक्षक घरच्या गरीबीमुळे प्रथम विद्यार्थी सहायक समितीच्या वसतीगृहात वाढण्याचे काम करीत होते. पुढे त्यांनी क्लासेस काढले. पुढे त्यांनी मोटारही खरेदी केली, बंगला बांधला. याबाबतीत गंनांची कॉमेन्ट, "वाढता वाढता वाढे"! एकदा सशि म्हणाला कथानकाच्या दृष्टीने इतःपर नको असलेलं पात्र दूर करण्याचा चित्रनिर्मात्यांचा हमखास उपाय म्हणजे त्या व्यक्तीला जिन्यावरून पाय घसरवून पाडायचं. गंना तात्काळ म्हणाला, "अहो, सुभाषितच आहे. "जिना यहाँ, मरना यहाँ, इसके सिवा जाना कहाँ ?" आम्हालाही हा गंनागुण थोडा वहुत लागला. मधुमेहाच्या विकारामुळे गंनाला साखर वर्ज्य ठरली. "अहो, आम्ही भाग्यवान, आम्हाला चहात वरून साखर घ्यावीच लागत नाही. आम्ही मुळातच गोड!" मी म्हटलं, "खरं आहे बाबा. तू तर बोलून चालून 'गन्नाच'. उसाच्या रसात कोणी साखर घालतो कां ?" आम्हा सर्व नवग्रहांची फर्गसनमधील नोकरीची वर्षे अतिशय आनंदात गेली. "नऊजणांचा नवयुवक प्राध्यापक संघ." असं म्हटलं की कानाला अगदी कसं 'अरुण तरुण मंडळ' किंवा 'रंजन दन्तमंजन' असंच काहीसं वाटतं. दोन हिंदीचे (स.म. परळीकर व वाह. ह. जोशी), दोन मराठीचे (सशि व गंना), एकजण राज्यशास्त्राचा (वि.मा. बाचल), एकजण अर्थशास्त्राचा (अविनाश जोशी), एक इंग्लिशचा (शरद गुप्ते), एक संस्कृतचा (दस्तूर खुद्द) अन् एक गणिताचा (अरविंद कोल्हटकर), सर्वांनाच सकाळचा पहिला तास असे आणि दुसरा तास नसे. आपला "शांतारामच्या कॅन्टिनचा" तास असे. शाळकरी मुलांना डबा खायची सुट्टी असते तशी. अरविंद गेल्यागेल्याच स्वतःसाठी 'दोन उपमा' अशी ऑर्डर द्यायचा. मग प्रत्येकाची आपापली फर्माईश. अधूनमधून एकमेकांच्या घरी अल्पोपहार/भोजन हे कार्यक्रम होऊ लागले. दिवाळीच्या वेळी असा कार्यक्रम स्वतःच्या घरी ठरवणं व आयते केलेले फराळाचे जिन्नस समोर ठेवणं या प्रकाराला बंदी होती. बाचलवहिनी सकाळपासूनच वाटण-कुटण करून संध्याकाळी झकास 'सागुती' आम्हास वाढायच्या. कित्येकदा अविनाशच्या किचनचा (चिकनचा नव्हे) ताबा घेऊन मी मस्ताड कोंबडी रस्सा करायचो. पोळ्या करणं जमायचं नाही म्हणून अविनाश गंनाला दोन मोठे 'लोफ' आणायला सांगायचा. पिशवी घेऊन बाहेर पडलेला गंना पुन्हा खात्री करून घेण्यासाठी दार ठोठावून 'लोफ' म्हणजे 'ब्रेड'च ना असं विचारून खसखस पिकवायचा. गंना आल्यावर 'लोफर' या उपाधीनं त्याला मंडित करण्यात येत असे. सर्वश्री नवरे मित्रमंडळाबरोबरच सर्व श्रीमती मैत्रीणशाखा सुरू झाली. एकमेकींच्याकडे हळदीकुंकवासाठी जाणंयेणं सुरू झालं. वहिनीगटास हळदीकुंकवासाठी तर भाऊजी मंडळीस फराळासाठी (खरे तर स्कूटर-ड्रायव्हर म्हणून).

या प्रकारातला धोका चाणाक्ष सशिनं सर्वात आधी हेरला. बाबांनो हा प्रकार अंगलट येण्याचा फार संभव आहे. मोहनकडे गेलो होतो म्हणून एकट्यानंच सिनेमाला जाणं हे उघडकीस येईल. सशिची बत्तीशी खरी ठरली. किस्सा थोडक्यात असा. त्यावेळी माणसं 'डॅम बिझी' नसायची. एकमेकांकडे निवांत पणे गप्पा मारायला जाण्याची प्रथा होती. आलेल्याला जेवणासाठी थांबवून घेण्याची आणि आलेल्यानं शिष्टपणा न करता थांबण्याची चाल होती. असाच एकदा मी रविवारी सकाळी गप्पा मारण्यासाठी गंनाच्या नारायण पेठेतल्या डुगडुगत्या लाकडी जिन्याच्या बिऱ्हाडी दाखल झालो. वहिनींनी मित्राच्या हातात दोन मोठ्या पिशव्या देऊन 'मंडई' आणण्यास सांगितले. दुचाकीवरून मंडईच्या मागल्या दुकानातून लांबडे छोटे कांदे गंनाने खरेदी केले. अख्खा कांद्याचा रस्सा ही वहिनींची खासियत होती. चला जेवायला म्हणताच कोणतेही आढेवेढे न घेता मी पाटावर ठाण मांडलं. गरमगरम लज्जतदार रस्सा आणि अगदी कडाही पुरेशा भाजलेल्या अशा मऊ सूत पोळ्या यांचा यथेच्छ समाचार घेतला. हात धुवून भावे यांची सुप्रसिद्ध मसाला सुपारी चघळत झकास गप्पा सुरू झाल्या. गंनाच्या घरी असलेलं पाण्याच्या साठवणीचं पीप बारकी बारकी भोके पडल्यानं, गळू लागलं होतं. हा प्रॉब्लेम वहिनी मला सांगत होत्या. माझ्यातली सूडबुद्धी जागृत झाली. आग्रहानं जेवायला घालणाऱ्या उपकारी मित्राला अपकारानं उत्तर न देईन तर मित्र कसला ! "वहिनी, नो प्रॉब्लेम. आमच्याकडेही अगदी हेच झालं होतं. तर बरंका गंगाधरपंत काम अगदी सोपं आहे. विजयानंद थेटराच्या जवळच्या बोहऱ्यांच्या दुकानातून मध्यम आकाराचा हबकचा डबा आणायचा. बारा आणेवाला किंवा चौदा आणेवाला एक ब्रश विकत घ्यायचा. पिपातलं पाणी ओतून पीप कोरडं झालं की एखाद्या खरखरीत धडप्यानं पुसून घ्यायचं. मग हबकचा एक हात आतून-बाहेरून असा द्यायचा. काही ठिकाणी जरूर असेल तर दुसरा हात मारायचा, की बसं." गंना माझ्या या हबकच्या उपचारामुळं हबकला असावा. वहिनी गंनाना उद्देशून म्हणाल्या, "पहा, ऐका ते संसाराला कसा हातभार लावतात ! नाही तर तुम्ही ! घेतलं पुस्तक की बसले वाचत. तेही तुमच्यासारखे प्रोफेसर आहेत ना?"

"भार्येचे बहुत साहावे" या वृत्तीने ग्रंथप्रेमी प्राध्यापक जोगळेकर तितिक्षेची परिमिता साधत होते.

क्षणिक आसुरी सुख मी भोगलं खरं पण 'जसे करावे तसे भरावे' या स्वरुपाचा निरपवाद भारतीय कर्मसिद्धान्त खरा ठरलाचं !

आमच्याकडे हळदीकुंकवासाठी सौ. वहिनी व कु. उज्ज्वल आल्या. गप्पांमध्ये वहिनी माझ्या बायकोला म्हणाल्या, "तुझं बरं आहे बाई. नवरा सगळ्या घरकामात मदत करतो..." इत्यादी. सौ. नं चातुर्यानं सगळी माहिती काढून घेतली. जोगळेकरवहिनी "येते हं" म्हणून गेल्या. वादळापूर्वीची ती एक क्षणिक शांतता अनुभवली. करड्या आवाजांत आमच्या नावाचा पुकारा झाला, "अहो !", "काय ?", "इकडं या !", "आलो", "बसा" बसलो, "आता सांगा आणखी किती थापा मारल्यात?", "हवालदार, माफ करा. माझी ही पहिलीच वेळ आहे" या धर्तीवर अजिजी मी सुरू केली. "म्हणजे बायका पहिलटकरीण असतात, तसे तुम्ही पहिलटकर म्हणायचे का ?" पुरता तावडीत सापडलो असल्यानं सगळं टोचून बोलणं ऐकून घेणं प्राप्त होतं.

"अहो, जरा पचतील अशा तरी थापा माराव्यात ना! हबक फासायला मुळात आपल्याकडे पाण्याचं पीप तरी आहे का ?" ताबुताच्या मिरवणुकीतल्या वाघांच्या पाठीवर अन् पोटावर हबकचे पट्टे देतात, मी तसाच चट्ट्यापट्ट्याचा वाघ्या दिसतो आहे असे वाटू लागलं.

वहिनी तर आधीच गेल्या. आठ वर्षांपलिकडे त्यांचा विरह गं.ना.ही सहन करू शकला नाही. या बाबत या उभयतांची सपशेल क्षमा मागायची माझी इच्छा होती. आता काय करू शकणार ? आपण त्यांचे चाहाते, आपल्यासमोरचं जाहीर क्षमा मागतो आणि माझ्या रसिक, कलाकार, अभ्यासू, संघटक मित्राला या स्मृतिलेखाच्या रूपानं मंजरीसहित तुळशीचं पान वाहतो.

**डॉ. मो. गो. धडफळे**
यशोदीप बी, रामबाग कॉलनी,
नवी पेठ, पुणे ४११०३०.

❖❖❖

# ‘फर्ग्युसोनिअन्स’ !

## स्वाती महाळंक

मी तेव्हा सर परशुरामभाऊ महाविद्यालयात शिकत होते. कलामंडळ, वादसभा अशा अनेक गोष्टींमध्ये सतत सहभाग असायचा. साहित्यिक उपक्रमांमध्ये भाग घेणारा, रमणारा आमचा तेव्हा छानमोठा ग्रुप होता. आम्ही सगळ्यांनी मिळून एस्.पी. मधील बरीच वर्षे बंद पडलेलं वाङ्मय मंडळ पुन्हा सुरू केलं. तिथेही दर आठवड्याला वेगवेगळे कार्यक्रम सुरू झाले. डॉ.अनुराधा पोतदार तेव्हा मराठीच्या विभागप्रमुख होत्या. एके दिवशी आम्हाला तीन-चार जणांना बोलावून त्यांनी एक पत्रक वाचायला दिलं. फर्ग्युसनमधील ‘साहित्य-सहकार’ने आयोजित केलेल्या काव्यस्पर्धेचं ते निमंत्रण होतं. पोतदार मॅडमनी आम्हाला भाग घेण्यासाठी आवश्यक असलेलं कॉलेजचं पत्र दिलं नि सांगितलं, “तिथे जोगळेकर सर आहेत, त्यांना जाऊन भेटा.”

त्याप्रमाणे आम्ही सरांना भेटलो. ती माझी सरांशी झालेली पहिली ओळख. स्पर्धा झाल्या. नंतर साहित्य-सहकारच्या आणखी काही कार्यक्रमांना आम्ही गेलो. दरवेळी सर भेटायचे. प्रत्येक कार्यक्रमाला शांतपणे मागे बसलेले असायचे. डोळ्यांच्या कोपऱ्यातून प्रत्येक गोष्टीवर बारीक लक्ष ठेवणं सुरू असायचं. कळत-नकळत हसून ओळख द्यायचे. पण जाड चष्म्यामागचे त्यांचे डोळे थेट समोरच्या माणसाचा वेध घ्यायचे. त्या नजरेत विलक्षण जरब आहे असं वाटायचं. त्यामुळे त्यांच्याशी बोलायचं म्हटलं की बिचकायला व्हायचं. एकदा साहित्य-सहकारतर्फे काही व्याख्यानं आयोजित करण्यात आली होती. त्यांची माहिती देताना संबंधित विद्यार्थ्यांनं व्याख्यानं महाविद्यालयातील विद्यार्थ्यांसाठी आहेत असा उल्लेख केला. आम्ही एस्.पी. मधले. मग आम्ही आलेलं चालणार की नाही ? आम्ही जोगळेकर-सरांकडे गेलो. मी त्यांना आमची शंका विचारली. ते नेहमीप्रमाणे रोखून बघत म्हणाले, “तुम्हाला अशी शंका का आली ?” मी त्यांना कारण सांगितलं तसं सर म्हणाले, “साहित्य-सहकार फर्ग्युसनमध्ये असलं तरी साहित्याची आवड असणाऱ्या सर्व विद्यार्थ्यांसाठी ते आहे. साहित्याचा अभ्यास करणाऱ्या, साहित्यक्षेत्रात काहीतरी करण्याची जिद्द बाळगणाऱ्या प्रत्येकासाठीचं ते खुलं व्यासपीठ आहे. तुम्ही अशा धडपडणाऱ्या विद्यार्थिनी आहात. त्यामुळे कसल्याही शंका मनात न आणता निर्धास्तपणे इथल्या कार्यक्रमांना अवश्य येत चला. कधीही काही गरज पडली तर माझ्याकडे येत जा.”

त्यानंतर साहित्य-सहकारचे कार्यक्रम, इन्सिक अशा कार्यक्रमांना उपस्थित राहता राहता आम्ही कधी मनानं ‘फर्ग्युसोनिअन्स’ होऊन गेलो आम्हालाही कळलं नाही.

❖❖❖

**स्वाती महाळंक**

---

पान क्र. ७ वरून पुढे

घेतलेल्या प्रत्येक प्रकट मुलाखतीमध्ये त्यांना ती म्हणायला लावली होती. आणि आता त्यांची आवड त्यांनी स्वतःच्या बाबतीत खरी केली आहे.

परंतु आम्हा सर्वांना मात्र आम्हाला सुखसावली देणारा वृक्ष उन्मळून पडल्यासारखेच वाटते.

**वृक्ष कैसा उन्मळे !**

वादळे आली किती, वादळे गेली किती<br>
तसूभरी जो ना ढळे - तो वृक्ष कैसा उन्मळे ?

शांत जो खंबीर जो, देई सर्वां धीर जो<br>
लाभता छाया अशी, ताप-चिंता-भय पळे !

मारल्या कोणी कुठारी, घातले कुणी घावही<br>
हासुनी तरिही जनी तो, देतसे अमृतनफळे !

शोक भरला आसमंती, सैरभैरही पाखरे -<br>
खेळ नियती खेळते, तो खेळ कोणा ना कळे !

**पराग जोगळेकर**<br>
२२, मनीषा सोसायटी, कर्वेनगर, पुणे-४११०५२.

❖❖❖










# श्री. पु. भागवत : एक सत्यकथा

मधू नेने, वाई



मंगळवारी २१ ऑगस्ट, २००७ रोजी मराठीतील ज्येष्ठ प्रकाशक श्री. श्री. पु. भागवत कालवश झाले. त्यांनी वयाची ऐंशीहून अधिक वर्षे ओलांडली होती. एक समृद्ध आयुष्य ते जगले. वृद्धापकाळाने ते गेले असले तरी त्यांच्या जाण्याने मराठी साहित्य सृष्टीतील एक तजेलदार पान गळून पडले याचे दुःख आहेच. मराठी साहित्यसृष्टीत मौज साप्ताहिक, मौज दिवाळी अंक, मौज प्रकाशन, मौज प्रेस आणि सत्यकथा मासिक या साऱ्यांना काही विशेष अर्थ प्राप्त झाला आहे आणि श्री. पु. भागवत त्याचा एक समर्थ खांब होते. साहित्याच्या या शिलेदाराने अध्यापन क्षेत्रातही स्वतःचा स्वतंत्र ठसा उमटवला होता; तरी भागवत म्हटले की मौज आणि सत्यकथा हीच नावे चटकन् नजरेसमोर येतात. एका अर्थाने साहित्यातला भागवत संप्रदाय म्हणजे मौज परिवार असे म्हणता येईल. यापैकी श्री. पु. भागवत यांनी आपल्या प्रज्ञेने आणि प्रतिभेने मराठी साहित्य जगताला एक नवी दिशा दिली. भागवत मूळचे कोकणातले. देवरुख हे रत्नागिरी जिल्ह्यातील एक गाव त्यांचे जन्मस्थान. तिथून ते मुंबईत आले; आणि पुढे स्थिरावलेही. श्रीपु एम्.ए. झाले आणि तत्सम क्षेत्रात ते खऱ्या अर्थाने रमले. त्यांनी स्वतः फारसं लिहिलं नाही, पण अनेकांना लिहितं केलं आणि जे लिहीत त्यांच्या लेखनाचं नेटकं संपादन त्यांनी केलं. पुस्तक प्रकाशनाला संपादक लागतो, नव्हे तो आवश्यक असतो हे भागवतांनी या क्षेत्रातल्या सुमारे पन्नास वर्षांच्या कारकीर्दीनं नुसते सिद्ध न करता अधोरेखित केलं.

एकेकाळी मौज साप्ताहिक आणि सत्यकथा मासिक यांनी मराठी साहित्यात एक दरारा निर्माण केला होता. मौजेमधून प्रचलित घटना घडामोडींचा वेध घेतला जायचा. त्यातील सदरं आकर्षक असत. सत्यकथेत लेख, कथा वा कविता एवढंच नव्हे तर पत्रही छापून आलं तरी त्याच्यावर साहित्यिक म्हणून शिक्का बसायचा. नंतरच्या काळात पुढं आलेल्या अनेक लेखक, कवींचा साहित्यिक जन्म सत्यकथेमधूनच झाला. सत्यकथा हे साहित्यिकांचं भागवत सांप्रदायिक विद्यापीठच होतं. श्री. ना. पेंडसे, गंगाधर गाडगीळ, जी. ए. कुलकर्णी, अरविंद गोखले, हमीद दलवाई, यांच्या सारखे कथाकार तर आरती प्रभू, दिलीप पुरुषोत्तम चित्रे, नामदेव ढसाळ, अरुण कोलटकर असे कितीतरी कवी या विद्यापीठाचे विद्यार्थी होते. श्रीपुंनी १९४५ पासून या दोन्ही नियतकालिकांच्या संपादनास सुरुवात केली. या काळातील तरुण श्रीपु प्रचंड वाचन आणि व्यासंग यामुळे संस्कारी होत गेले, सोबतीला तत्कालीन सामाजिक, सांस्कृतिक, राजकीय चळवळी आणि निरनिराळे तत्त्वविचार (इझम्स) यांचा परिणाम त्यांच्या मनावर होत होताच. त्यातून त्यांचं व्यक्तिमत्त्व घडत गेले आणि सत्यकथेनं त्यांना साहित्य समीक्षेचं, संपादनाचं क्षेत्र मिळवून दिलं. सत्यकथेच्या संपादनात भागवतांनी काही वेगळे प्रयोग केले. सत्यकथेसाठी येणाऱ्या मजकुरातील शब्द न् शब्द पारखून, तपासून मगच तो प्रसिद्ध व्हायचा. ते स्वतः काही लेखकांना पत्रं लिहायचे. या पत्रांचं वैशिष्ट्य म्हणजे ती अगदी छोटीशी पण त्यातून मोठा भावच व्यक्त होणारी असत. लेखकानं कसं लिहावं याचं ते मार्गदर्शन असे पण त्यात तसा भाव नसे. 'सत्यकथा' बंद पडूनही दोन दशकांचा काळ लोटला पण अजूनही 'सत्यकथे'चा रम्य भूतकाळ अनेकांना खुणावतो. काळाच्या ओघात साप्ताहिक म्हणून मौजही मागं गेलं पण अजूनही दिवाळी अंकाच्या रूपानं मौजेची 'मौज'

आस्वादायला मिळते. श्रीपु स्वतः उत्तम संपादक होतेच पण त्यांनी लेखकांबरोबरच काही संपादकही घडवले. राम पटवर्धन किंवा श्रीनिवास विनायक कुलकर्णी ही नावं या संदर्भात प्रातिनिधिक मानता येतील.

मौज प्रकाशन १ ऑगस्ट, १९५० रोजी सुरू झालं आणि गेल्या सत्तावन्न वर्षांत अक्षरशः असंख्य विषयांवरील असंख्य पुस्तके या संस्थेनं प्रकाशात आणली. पुस्तकांचं संपादन हा खास श्रीपुंनी तयार केलेला प्रांत. आपलं पुस्तक 'मौजे'च्या मांडवा खालून जावं असं अनेक ज्येष्ठ लेखकांना वाटावं. यातच भागवतांच्या संपादनाचं महत्त्व आणि मौज प्रकाशनाचं व्यावसायिक यश दडलेलं आहे. साहित्यिकांच्या तीन पिढ्यांबरोबर श्रीपुंचं नातं होतं. ते सभा-संमेलनांत फारसं बोलत नसत, पण चार वर्षांपूर्वी त्यांची कराड साहित्य संमेलनातली प्रकट मुलाखत त्यांच्या काही वादग्रस्त विधानांमुळे गाजली होती. तर श्रीपुंनी 'चतुरंग'चा 'जीवनगौरव' पुरस्कार मनोहर जोशी यांच्या हस्ते स्वीकारू नये असे आवाहन विजय तेंडुलकरांनी केले होते, मात्र श्रीपुंनी तिकडे दुर्लक्षच केले. शांत, संयमी, मितभाषी, कटुता टाळणाऱ्या, साहित्यावर मनापासून प्रेम करणाऱ्या श्रीपुंना मानपत्रात मानवंदना देताना रवींद्र पिंगे यांनी 'भला, कर्तृत्ववान माणूस' अशा समर्पक शब्दात गौरविले आहे. याच मानपत्रात 'विशुद्ध नजरेने सांस्कृतिक उद्दिष्टांकडे पाहू शकणारा ज्येष्ठ विचारवंत' म्हणून श्रीपुंचा उल्लेख केला आहे, मराठी साहित्यसृष्टीचा आधारवड असलेली श्री.पु. भागवत नावाची एक 'सत्यकथा' आता 'एक होते श्रीपु' अशा 'कहाणी'त विसावली आहे !

**मधू नेने**
हिरण्यकेशी, १२७, गंगापुरी,
वाई, जि. सातारा ४१२ ८०३
दूरध्वनी : ०२१६७/२२०६९०,
भ्रमणध्वनी : ९८८१२०८७६०

❖❖❖









अनुक्रमणिका

पुस्तक परिचय

# कातकरी : विकास की विस्थापन : डॉ. मिलिंद बोकील

## एक आढावा

भारताचे जनजीवन असंख्य जाती-जमातींनी संपन्न झाले आहे. यात आदिम जातींचा आणि जमातींचा उल्लेख रामायण-महाभारताच्या काळापासून आहे. केवळ नामोल्लेखाने या आदिम समुहांचे जीवन समजणारे नाही. त्यासाठी मिलिंद बोकीलांसारखे प्रत्यक्षदर्शी अभ्यासक याचे आंतर-बाह्य विश्लेषण करून आगळे-वेगळे संशोधन करतात. 'कातकरी-विकास की विस्थापन' हा मिलिंद बोकील यांचा मौज प्रकाशनाने जानेवारी २००७ मध्ये प्रकाशित केलेला ग्रंथ कातकरी मानवसमुहाच्या चिवट जीवननिष्ठेचा वेध घेणारा ग्रंथ आहे. या निमित्ताने आदिवासींच्या सामाजिक-सांस्कृतिक जीवनाचा अनोखा परिचय, हा जसा वाचनानंदाचा भाग आहे; तसाच तो आदिवासींच्या अनेक समस्यांनी वेढलेल्या भयाण असुरक्षित जीवनाचा परिचय अंतर्मुख करायला लावणारा आहे.

खैराच्या झाडापासून कात करणारा तो कातकरी होय. खैरापासून कात करणारा कातकरी वरकरणी अर्धभटके दरिद्री मजूर म्हणून दिसत असले तरी; एक जैव-रसायन तंत्रविद्या राबविणारे मेहनती उद्योगी लोक होते. बारा बलुतेदारांना समाजव्यवस्थेत महत्त्वाचे स्थान होते. परंतु कातकरी समाजाचे मात्र शोषणच झाले. कारण हे सर्व भूमीहीन होते. कात उद्योगाचे ते आदिम वारसदार असूनही, या उद्योगाचे जसजसे व्यापक व्यापारीकरण होऊ लागले तसतसे ते विस्थापितच होत गेले. महाराष्ट्रात कुलाबा (रायगड), ठाणे, पेण-पनवेल परिसर आणि भारतभर पसरलेला हा खैर-उद्योग कातकऱ्यांच्या हातून निसटला; आणि ते अक्षरशः देशोधडीला लागले. जीवन जगण्याच्या दुर्दम्य निष्ठेने त्यांनी उपजीविकेच्या अनेक वाटा शोधल्या. कातकऱ्याचे ते कोळसाकरी झाले. खैराच्या झाडापासून कोळसा बनविणारे कामगार झाले. ब्रिटिश राजवटीने मूळच्या 'आळी' आणि 'दळी' शेतीचे कायदे केले. स्वातंत्र्यानंतर बॉम्बे फॉरेस्ट ॲक्टने वेगळेच स्वरूप धारण केले. ब्रिटिशांनी आदिवासी कातकरी, वारली, ठाकर, महादेव कोळी यांना जंगलाचा विशिष्ट भाग राखून दिला– वहिवाट हक्क (usufruct rights) दिले. जंगलात राहण्याची परवानगी दिली. या सवलती स्वातंत्र्योत्तर काळाने काढून घेतल्या. जंगल कॉन्ट्रॅक्टरच्या तावडीत सापडलेले कातकरी अक्षरशः गुलामगिरीचे जीवन जगू लागले. कल्याणकारी राज्याने 'कमाल जमीन धारणा कायदा', 'कूळकायदा' असे अनेक कायदे केले; परंतु जंगलजीवनावर जगणाऱ्या आदिवासींना खऱ्या अर्थाने विस्थापित केले; आणि गुलाम केले. त्यांना मालकीची जमीन नसल्याने अस्थिर जीवन जगण्यातच हा मानवसमूह मागासला गेला. अस्थिर जीवनाने शिक्षण नाही, संस्कृती नाही, कार्यशक्ती वापरण्याला आधार नाही.

आदिवासींच्या हक्कांसाठी जे लढे झाले. त्याचा वेचक इतिहास मिलिंद बोकीलांनी मांडला आहे. १९५५ ची आदिवासी विकास परिषद (माणगाव-कोलाद) आणि खालापूर साजण्याची परिषद, १९५८ चा कुलाबा जिल्हा आदिवासी विकास संघ, पुढे शे.का.प. आणि १९७७ ला जयप्रकाश नारायण यांच्या प्रेरणेने लढणारी आदिवासी हक्क जागृती झाली. ठाकूर, वारली, महादेव-कोळी इत्यादींना जमिनीचे स्थैर्य मिळाले. पूर्वीचे कसणारे मालक झाले. कातकरी मात्र अस्थिर तो अस्थिरच राहिला. थोड्याफार प्रमाणात त्यांचा प्रश्न सुटायच्या बेताला आला; तोही राजकीय अस्थिरतेने घालविला. वनखाते केंद्र आणि राज्यशासनाच्या ओढाताणीत अडकले. आणीबाणी आणि त्यानंतरचे आघाड्यांचे राजकारण व नेतृत्वाची फाटाफुटी यामुळे आदिवासींचे प्रश्न दुर्लक्षित राहिले. आदिवासी विकासासाठी राखीव जमिनी आता बिल्डर-कॉन्ट्रॅक्टर गिळंकृत करू लागले. हिल्-स्टेशन्स,

पंचतारांकित हॉटेल्स, ॲम्बी-व्हॅली-सिटी सारख्या कोट्याधीशांच्या वसाहंती, तथाकथित सैनिकी शाळा, श्रीमंतांची शाळा-कॉलेजेस, फार्म-हाऊसेस या सर्वांनी आदिवासी जमिनींवर अतिक्रमण करून पुन्हा त्यांना विस्थापित केले आहे. यात भूमीहीन अस्थिर जीवन जगणारा, मूळच्या कुशल-कामगाराने ऊसतोड कामगाराची, कोळसा-कामगाराची वाट धरली आहे. यातूनही ते हिमतीने वाट काढीत आहेत. मजुरीच्या दुष्टचक्रात अडकलेला कातकरी आता रोजमजुरी, मासेमारी, कोंबड्यापालन, कोळसाकरी, वीटकरी, भाजीपाला-विक्री इत्यादी अनेक उद्योगात हिमतीने उभा आहे. परंतु त्यांना जीवनाच्या मुख्य-प्रवाहात आणण्याचे स्वप्न अद्याप तरी प्रत्यक्षात येण्याची वाट पहात आहे. सामाजिक शोषणाला खंबीरपणे तोंड देत जगणारा कातकरी दरिद्री, कुपोषित असला तरी गुन्हेगार झाला नाही. आपल्या सभ्यतेला व सुसंस्कृतीला तो टिकून आहे. आपल्याच समाजाचा हा हिस्सा विकसित होण्याऐवजी विस्थापितच होत आहे याची खंत, हा ग्रंथ वाचल्यावर, सलत राहते. असे असले तरी कातकऱ्यांचे खंबीर मन व जीवननिष्ठा यावर मात करते.

(मानव वंश-शास्त्र आणि सामाजिक विषयाला वाहिलेले, महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे के. पी. आणि कमल भागवत पारितोषिक मिलिंद बोकील यांच्या 'कातकरी-विकास की विस्थापन' या ग्रंथाला मिळाले.)

**कातकरी : विकास की विस्थापन**
लेखक - डॉ. मिलिंद बोकील
मौज प्रकाशन, मुंबई
(जानेवारी २००७)

**डॉ. सु. प्र. कुलकर्णी**

❖❖❖

## साहित्याच्या दरबारातील महनीय व्यक्तींना श्रद्धांजली !

- महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे चे विश्वस्त न्यायमूर्ती प्रतापराव बेहेरे.
- संपादक – प्रकाशक – समीक्षक श्रीकृष्ण पुरुषोत्तम भागवत. मौज आणि सत्यकथेच्याद्वारे अनेक मान्यवर लेखकांना घडविणारे गाडगीळांच्या कथा, जीएंची पत्रं – दोन खंडात साहित्याची भूमी (संपादक – वासंती मुजुमदार) मौज प्रकाशन गृह संस्था.
- वृंदा लिमये – बालसाहित्य लेखिका – कवयित्री

  काव्यसंग्रह – काळोख कमळ (१९८१) निःशब्दाचे रंग (१९९६)

  बालसाहित्य – जंतर मंतर (१९६६) लॉलिपॉप (१९७१)

  कमाल आणि धमाल (१९७७), अटकमटक (१९९४), टिवल्या बावल्या (१९९२) सत्यकथेच्या माध्यमातून वेळोवेळी लिखाण.
- बाल साहित्यकार सुधाकर प्रभू – (१९३० ते २००७) बी.ए., बी.एड्. हिंदी माध्यमिक विद्यालय, पुणेचे मुख्याध्यापक – बालसाहित्यकार, नाटककार बालमित्र मासिक १९५३ पासून बालांकरिता २०० हून अधिक पुस्तके – चरित्रे, युद्धकथा, लघुकादंबरी आणि नाटके
- संगीतकार दत्ता डावजेकर
- शांताबाई किर्लोस्कर – साहित्य प्रेमी भगिनी मंडळाच्या अध्यक्षा.







अनुक्रमणिका

पुस्तक परिचय

# विधवाश्रमाचा पुनःप्रत्यय 'वॉटर आणि मी'

प्रा. मिलिंद जोशी

दीपा मेहता यांचा 'वॉटर' हा चित्रपट अनेक कारणांमुळे गाजला. या चित्रपटाचे ऑस्कर पुरस्कारासाठी नामांकन झाले होते. २००० साली या चित्रपटाचे चित्रीकरण सुरू झाले होते. भारतातील विधवा स्त्रियांच्या वाट्याला येणाऱ्या दुःखाची कथा हा या चित्रपटाचा केंद्रबिंदू होता. काशी संस्कृती सुरक्षा समितीने विरोध केल्यामुळे या चित्रपटाचे चित्रीकरण मध्येच थांबवावे लागले. भारतातील धर्ममार्तंडांचा विरोध लक्षात घेऊन दीपा मेहता यांनी या चित्रपटाचे काम श्रीलंकेत नव्याने सुरू केले. या चित्रपटात पुण्यातल्या डॉ. विदुला जवळगेकर यांना पतिराजीची भूमिका मिळाली. त्यांनी या भूमिकेचे सोने केले. भारतात कुणालाही चाहूल न लागता हा चित्रपट श्रीलंकेत पूर्ण झाला. या सगळ्या प्रवासातले अनुभव खूपच रोमांचकारी होते. विधवाश्रमातील असहाय, हतबल विधवा स्त्रियांच्या भूमिका साकारत असताना त्या काळाचा संपूर्ण पट डोळ्यासमोर ठेवून भूमिका साकारणे हे मोठे आव्हान होते. पण या चित्रपटातील सर्व कलाकारांनी ते यशस्वीपणे पेलले. या चित्रपटात भूमिका करीत असताना अगदी भूमिकेसाठी निवड झाल्यापासून ते चित्रीकरण पूर्ण होईपर्यंत त्यांनी जे अनुभव घेतले ही भूमिका साकारत असताना भारतीय विधवा स्त्रियांच्या संदर्भात त्यांच्या मनात जी अस्वस्थ करणारी स्पंदने उमटली. भावनांचा आणि विचारांचा जो एक कल्लोळ त्यांनी अनुभवला तो त्यांनी अतिशय प्रामाणिकपणे 'वॉटर आणि मी' या पुस्तकात मांडला आहे.

स्वातंत्र्यपूर्व कालखंडात विधवा स्त्रियांकडे पाहण्याचा दृष्टिकोन खूपच वेगळा होता. पतीचे निधन झाले यात जणू त्या स्त्रीचाच दोष आहे; अशा भावनेने तिला वागवले जात असे. तिचे घरात असणे अशुभ मानले जायचे. तिने कोणत्याही सुखाचा उपभोग घ्यायचा नाही. स्वतःला कोणतेही मोह पडू नयेत यासाठी तिचे केशवपन केले जायचे. तिने परिधान करायची वस्त्रेही वेगळी असायची. अशा विधवा स्त्रियांना मग अनेकदा विधवाश्रमात सोडले जायचे. तिथे सगळ्याच स्त्रिया दुःखी ! परंपरेच्या रेट्यामुळे त्यांची आयुष्यं निराशेच्या गर्तेत ढकलली जायची. त्यांनी सर्वस्वाचा त्याग करायचा, स्वतःचे मन मारायचे, नकोसे वाटणारे एक व्रतस्थ जीवन जगायचे. संस्कृतीला बट्टा लागू नये म्हणून हे सारे निमूटपणे सहन करायचे. मेलेल्या पतीची आठवण काढत आणि पूर्वायुष्यातील सुखद स्मृतींना उजाळा देत उदासवाणे जीवन जगायचे. हे सारं भोगणाऱ्या विधवांच्या, माणसाला अंतर्बाह्य हलवून टाकणाऱ्या अनेक कथा, 'वॉटर' या चित्रपटात आहेत. मग त्या विधवाश्रमाचे प्रमुखपद एखाद्या ज्येष्ठ विधवेकडे असायचे. त्या अभागी संस्थानची ती दुर्दैवी राणी असायची. मग तिची घुसमट बरोबरच्या समदुःखी मैत्रिर्णीवर राग काढून व्यक्त व्हायची. या विधवाश्रमाचे अर्थकारण तिला पहावे लागत असे. ज्या संस्कृतीने या विधवांना या आश्रमात ढकलले तीच संस्कृती, त्या संस्कृतीतील शुचितेचा आव आणणारी पाखंडी माणसं आपल्या कामवासनांची तृप्ती करण्यासाठी इथल्या विधवांना वेश्या व्यवसाय करायला भाग पाडत. तरुण, सुंदर विधवांच्या जीवावर अशा आश्रमांचे अर्थकारण चालत असे. त्यासाठी अशा तरुणविधवा स्त्रियांना केस राखण्याची परवानगी होती. वृद्ध आणि इतर विधवांनी मात्र केस ठेवायचे नाहीत असा नियम असायचा. एकीकडे विधवा स्त्रियांनी केस ठेवले तर धर्म बुडेल असा आकांडतांडव करणारे संस्कृतिरक्षक दुसरीकडे मात्र स्वतःच्या कामवासना शमविण्यासाठी एका नव्या विकृत संस्कृतीचे पोषण करीत असत. एकीकडे पती निधनाचे दुःख, दुसरीकडे आई-वडील,

सासू-सासरे आणि घर यापासून दुरावल्यामुळे वाट्याला आलेले एकटेपण, तिसरीकडे या आश्रमातील नरकयातना, जीवन जगण्याची इच्छा असतानाही मारावे लागणारे जीवन, या सगळ्यात दिवसेंदिवस मृत होत चाललेला आत्मसन्मान. ही सगळी घुसमट अतिशय प्रभावीपणे 'वॉटर' या चित्रपटात आलेली आहे. जिच्या ओठावरचे दूध अजून सुकलेले नाही अशी 'छुइया' नावाची एक अगदी छोटी मुलगी वयाने कितीतरी मोठी असलेल्या पतीच्या आकस्मिक निधनानंतर समाजातल्या अनिष्ट प्रथांना बळी पडते. तिचे काळेभोर, लांबसडक केस कापले जातात. हे काय चालले आहे हे समजण्याचे तिचे वय नाही. पतीच्या अंत्यसंस्कारानंतर पांढरी वस्त्रं घालून तिला तिचे आईवडील छोट्याशा दरवाजातून या नरकात ढकलतात. ती कावरीबावरी होते. जिवाच्या आकांताने टाहो फोडते. वृद्धाश्रमाच्या दगडी भिंती भेदून तिचा आवाज बाहेर जाऊ शकत नाही. मग या नव्या छोट्या मैत्रिणीला वडिलधाऱ्या मैत्रिणी स्वतःत सामावून घेतात. प्रत्येकांच्या दुःखाचा पदर वेगळा, त्यातले सलणारे अस्वस्थ करणारे धागे वेगळे, घुसमट व्यक्त करण्याचे मार्ग वेगळे आणि रोजचं अस्वस्थ जगणं. मरणाची वाट पाहणारं ! अशा अनेक कंगोऱ्यातून विधवा स्त्रियांचं बहुपेढी दुःख, त्यांची शारीरिक, मानसिक, भावनिक घुसमट एका काळ्याकुट्ट कालखंडाची, शरमेने खाली मान घालायला लावणाऱ्या रूढी परंपरांची आठवण करून देत दीपा मेहता यांनी या चित्रपटातून मांडली आहे.

डॉ. विदुला जवळगेकर यांना या चित्रपटातील 'पतीराजीची' भूमिका मिळाली. या पतिराजीला अगदी लहानपणी वैधव्य आले होते. तिला तिचे लग्न आठवत असते. वरात आठवत असते. साजुक तुपातील मिठाईचा घमघमाट तिला अस्वस्थ करीत असतो. ते पदार्थ खाण्याची अनिवार इच्छा तिच्या मनात असते. पण या विधवाश्रमाच्या नियमांपुढे तिला आपले मन मारून जगावे लागत असते. या नवीन आलेल्या छुइया नावाच्या मुलीच्या रुपाने तिला एक छोटी मैत्रिण मिळते. तिच्याशी संवाद साधताना ती मोकळी होते. ही भूमिका हे एक मोठे आव्हान होते. डॉ. विदुला जवळगेकरांनी ते पेलले.

या भूमिकेसाठी त्यांची जेव्हा निवड झाली तेव्हा त्यांना विशेष काहीच माहीत नव्हते. चित्रपटाचे नावही ठाऊक नव्हते. ऐंशी वर्षांच्या विधवा स्त्रीची भूमिका करताना तुम्हाला डोक्यावरचे केस काढावे लागतील एवढे मात्र सांगितले गेले होते. त्यांचे घर सनातन धर्माचे काटेकोरपालन करणारे होते. विहीत कर्मकांडं त्यांच्या घरात व्यवस्थितपणे पार पाडली जात होती. पण त्यातला फोलपण लक्षात आल्यामुळे डॉ. जवळगेकरांचे पती त्यातून बाहेर पडलेले होते. विदुलाताई लहानपणी पुरोगामी संस्कारात वाढलेल्या होत्या. त्यामुळे उभयतांनी ही अट मान्य केली. श्रीलंकेत चित्रीकरणासाठी पतीसह गेलेल्या जवळगेकरांचे केस कापण्यापूर्वी त्यांनी मंगळसूत्र व इतर दागिने काढून ठेवले. साक्षात् पतीच्या सहवासहात त्याची विधवा म्हणून त्यांना राहावे लागत होते. वृत्ती पुरोगामी असली तरी परंपरेच्या वाटेने जाणारे मन कसोटीच्या क्षणी अनेकदा द्वंद्व निर्माण करते. पण या साऱ्यावर त्यांनी मात केली आणि अभिनयाचे आपले काम चोख बजावले. या साऱ्या घडामोडीत त्यांचे चिंतनशील मन एकूणच भारतीय स्त्री जीवनाचा कसा वेध घेत होते, याचे प्रत्यंतर हे पुस्तक वाचताना येते.

जीवनप्रवेश, काळोखाचा डोह, लखलख चंदेरी, नवी दिशा, वॉटर, श्रीलंका : भाग्योदय, विधवा - काल आणि आज आणि समारोप अशा नऊ प्रकरणातून मनात उमटलेली भावनांची आणि विचारांची आंदोलने लेखिकेने प्रामाणिकपणे मांडली आहेत. सुसंस्कृत घरात वाढत असताना लहानपणी डोक्यावरून पदर घेणाऱ्या केशवपन केलेल्या विधवा स्त्रिया पाहिल्यानंतर त्यांच्या मनात अनेक प्रश्न येत असत. समजुतदार वडील त्याची योग्य उत्तरंही देत असत. त्यातून रूढीपरंपरांच्या आहारी न जाता चिकीत्सक अभ्यास करण्याची तयार होत गेलेली वृत्ती, शिक्षणातून आलेले शहाणपण आणि व्यक्तिमत्त्वाला लाभलेली एक विचारांची बैठक या साऱ्या बळावर भावनेच्या आहारी न जाता विवेकाच्या आणि चिंतनाच्या कसोटीवर नव्या गोष्टी तपासून

पाहण्याची लेखिकेची एक वेगळी दृष्टी या साऱ्या लेखनातून दिसून येते. 'वॉटर' चित्रपटाच्या निमित्ताने अपार मेहनत घेणारी दीपा मेहता, तिचे सहकारी, जॉन, अब्राहम, लीसा रे, सीमा विश्वास अशा दिग्गज कलाकारांचा त्यांना सहवास लाभला. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या विविध पैलूंचे दर्शन लेखिकेने या पुस्तकात घडविले आहे. उत्तमाचा ध्यास असणारी ही सगळी मंडळी सर्वोत्तमाच्या प्रकटीकरणासाठी किती अधीर होती. साध्या साध्या गोष्टीतही तडजोड न करण्याची या लोकांची वृत्ती गुणवत्तापूर्ण कामगिरीला कशी सहाय्यभूत ठरत होती; याचे लेखिकेने केलेले चित्रण भावणारे आहे. ८० वर्षांची ही पतीराजी लेखिकेच्या मानगुटीवर बसली. तिचा संपूर्ण कब्जा तिने घेतला. लेखिका ही भूमिका अक्षरशः जगली. विदुला जवळगेकर ते पतिराजी आणि पतिराजी ते पुन्हा विदुला जवळगेकर हा प्रवास कशा प्रकारचे अनुभव देत होता याचेही मार्मिक चित्रण या पुस्तकात आहे.

या पुस्तकातील 'विधवा : काल आणि आज : सिंहावलोकन' हे प्रकरण लेखिकेच्या अभ्यासू आणि संशोधकवृत्तीचे निदर्शक आहे; असेच म्हणावे लागेल, मराठीतील आद्य वास्तव कादंबरी म्हणून ज्या कादंबरीचा उल्लेख आपण करतो त्या बाबा पद्मनजी यांच्या 'यमुनापर्यटन' या कादंबरीतील संदर्भाने या प्रकरणाची सुरुवात होते. ह. ना. आपटे यांच्या 'पण लक्षात कोण घेतो.' या वास्तवदर्शी कादंबरीचा विचार या प्रकरणात आहे. प्रार्थना समाजातील सभांमधून आणि 'सत्यशोधक' सारख्या पत्रिकेतून मांडल्या गेलेल्या पुरोगामी विचारांचे नव्या दृष्टिकोनातून केलेले चिंतन या प्रकरणात आहे. १८५७ साली रावबहादूर दादोबा पांडुरंग यांनी परखडपणे मांडलेल्या विचारांचे संकलन इथे आढळते. पुरोगामी घरातल्या विधवा, स्वावलंबी विधवा, मानिनी विधवा यांच्या संदर्भातले लेखिकेचे चिंतन महत्त्वाचे आहे. वृंदावनचा आजचा विधवाश्रम कोणत्या अवस्थेत आहे ? महासत्ता होण्याची स्वप्नं पाहणाऱ्या भारताला असे विधवाश्रम शोभणार आहेत ? या संदर्भातले लेखिकेचे भाष्य विचार करायला लावणारे आहे. या साऱ्या कोनातून विधवा स्त्रियांच्याकडे पाहत पाहत लेखिका जेव्हा आजच्या स्त्रियांकडे पाहते; तेव्हा तिथेही पुरुषप्रधान संस्कृतीचाच वरचष्मा तिला दिसतो. या संदर्भात तिरूपती देवस्थानचे लेखिकेने दिलेले उदाहरण मार्मिक आहे. तिरुपतीला दरवर्षी साठ लाख भाविक आपले केस अर्पण करून मुंडण करून घेतात. त्यात पुरुषांप्रमाणे स्त्रियांचाही समावेश असतो. स्त्री भाविकांच्या मागणीवरून देवस्थानच्या कार्यकारी अधिकारी असलेल्या कृष्णनायिनांनी वीस महिलांची रितसर नाभिक म्हणून नेमणूक केली. या निर्णयाला देवस्थानातल्या चारशे नाभिकांनी विरोध केला. 'केस कापण्याचे काम स्त्रिया करू लागल्या तर पूर, भूकंप, सुनामी यासारखी संकटं येतील' असे धर्मवेडे म्हणू लागले. प्रकरण कोर्टात गेले. हायकोर्टाने निर्णय दिला. वीस स्त्रियांऐवजी शंभर स्त्रियांची नेमणूक करा. स्त्रियांची नेमणूक केली तरी त्यांच्याकडून मुंडण करून घ्यायला भाविक तयार नव्हते. त्यांची मानसिकता बदलण्याची जबाबदारी काही कार्यकर्त्यांकडे देण्यात आली. इथल्या पुरुष नाभिकांना प्रत्येक भाविकांच्या पाठीमागे दहा रुपये मिळतात तर स्त्रियांना फक्त दोन रुपये मिळतात. 'भेदाभेद अमंगल !' मानणाऱ्या देवाच्या दारात हा भेद राजरोसपणे केला जातो. तेव्हा किती आंदोलनं छेडली जातात ? एखादीने अशी प्रकरणं धसास लावण्याचा प्रयत्न केला तर तिला कोणत्या दिव्यातून जावे लागते ? हे सारे खपवून घेणाऱ्या भारताला पुरोगामी म्हणता येईल का ? या आणि अशा अनेक प्रश्नांची चर्चा या पुस्तकात आहे.

अनेकांच्या मनात प्रश्न येईल; हे लेखिकेचे आत्मकथन किंवा आत्मचरित्र आहे का ? या पुस्तकाला आत्मकथन म्हणता येणार नाही. एका चित्रपटातील भूमिकेच्या निमित्ताने आलेल्या अनुभवाचे चित्रण या पुस्तकात आहे. खूप मोठा परिघ व्यापणारे हे अनुभव कथन आहे. कोणताही आव न आणता एखादा सामान्य माणूस एखाद्या घटनेकडे पाहून त्रयस्थाच्या भूमिकेतून आपली जी सहजप्रतिक्रिया व्यक्त करतो; त्या भूमिकेतून हे पुस्तक लिहिलेले आहे. त्यामुळे ते वाचकांना खिळवून ठेवते. अनेकदा त्याला अस्वस्थ करते; आणि

(पान क्र. २६ वर पहा

# संभ्रमाच्या पाण्यात...

चिंतनगर्भ ललितलेख

**शंकर सारडा**

'मी एक स्त्रीजातीय अस्वस्थ आत्मा', 'संबद्ध' हे काव्यसंग्रह, आणि 'हृदयस्पर्शी', हा ललितलेख संग्रह याद्वारे अंजली कुलकर्णी यांनी एक चिंतनशील साहित्यकार म्हणून आपली मुद्रा चोखंदळ रसिकांवर उमटवली आहे. स्त्री म्हणून 'स्व'त्त्वाची ओळख होणे आणि एकूणच आपल्या अस्तित्त्वाचा अर्थ शोधणे यातून त्यांचे काव्य स्फुरले; आणि ललितलेखन बहरले. त्या 'अस्वस्थते'तूनच विविध वाङ्मयीन उपक्रमातही त्या सहभागी होतात; आणि आपल्या समानधर्मी साधकांशी संवाद साधू पाहतात.

'संभ्रमाच्या पाण्यात गटांगळ्या' ह्या त्यांच्या ताज्या ललितलेख संग्रहातील 'शोध-ध्यास आदितत्त्वाचा', 'एकान्ताची ओढ आणि एकलेपणाशी सामना', 'शरीराची कहाणी', 'नात्यांचं जुळणं-नात्यांचं तुटणं,' 'प्रणय-ओथंबून आलेलं ओलं आभाळ', 'मला दिसलेला पुरुष' ही काही शीर्षके बघितली तरी अंजली कुलकर्णी यांच्या चिंतनगर्भ शोधात्मकतेची खूणगाठ पटेल. आपले पृथगात्म व्यक्तित्त्व, आपले सामाजिक संदर्भ, आपले अस्तित्व, आपली कलानिर्मिती, साधना, आपले देहभान, आपली नाती यांचे स्वरूप जाणून घेण्याचा तलस्पर्शी प्रयत्न या लेखनप्रक्रियेत दिसतो.

'संभ्रमाच्या पाण्यात गटांगळ्या' या लेखात तारुण्यात पदार्पण करणाऱ्या मुलामुलींच्या मनातील भिन्नलिंगी व्यक्तिविषयक ओळख, आकर्षण, मैत्री, प्रेम या भावनांच्या संभ्रमाचं जे काहूर माजलेलं असतं, त्याचं स्वरुप हळुवारपणे उलगडून दाखवण्यात आलं आहे. हे नातं परिचयाचं असो, मैत्रीचं असो की प्रेमाचं, ते 'क्लिक्' व्हावं लागतं. त्यातील शारीरिकता किंवा लैंगिकता आणि शरीर-निरपेक्षता (प्लेटॉनिक लव्ह) यांच्याबद्दलही स्पष्टता असावी लागते. एकत्रितपणे केलेलं सामाजिक, वाङ्मयीन सांस्कृतिक, विधायक निर्मितीक्षम काम हे देखील 'समागमाइतकाच किंवा त्या तोडीचा आनंद' देऊ शकतं असं त्या सुचवू पाहतात. 'शारीरिक नात्याचा बाऊ करण्याचं कारण काय ?' असा प्रश्नही त्या विचारतात. एकतर्फी प्रेम व त्यातील निराशेपोटी होणाऱ्या आत्महत्या वा प्रिय व्यक्तीची हत्या हा सध्याचा एक मोठा सामाजिक प्रश्न आहे. त्यामागे पुरुष असणं आणि श्रेष्ठ असणं हे समीकरण प्रभावी ठरते; याकडेही त्या लक्ष वेधतात. 'फ्रेंडशिप' आणि 'लव्हशिप' यातील फरक समजण्याएवढी प्रगल्भता हवी. हिंदी सिनेमातील नायकनायिकांची रोल मॉडेल्स प्रेमभावनेचं हिंसेत, विकृतीत विद्रूपतेत रूपांतर करतात; प्रेमभावनेचा आदर करायला शिकायला हवे; स्वतःच्या मनात नेमकी काय भावना आहे हे समजून घेऊन दुसऱ्याशी असणारं नातं किती फुलू वाढू द्यायचं ते ठरवायला हवे; अर्थात् आपल्या अंतर्यामीच्या पेर्शीच्या अनावर हाका, रक्ताच्या उसळणाऱ्या लाटा आणि त्यात खाल्लेल्या गटांगळ्या यांची उत्स्फूर्तता आणि आवेग हा तर्कापलीकडचा असतो; माणूसपणाची पातळी न सोडण्याचं भान ठेवून त्या उत्स्फूर्त आवेगाला अवसर देणे हेच श्रेयस्कर असा इशाराही त्या देतात.

अशा व्यापक भूमिकेतून एकूणच मानवी व्यवहाराकडे पाहण्याचा समजंसपणा अंजली कुलकर्णी यांच्या चिंतनाला गहिरी डूब देतो. संभ्रमापलीकडे जाण्याची दिशा स्पष्ट करतो. निरागस, नैसर्गिक आविष्काराचा, खऱ्याखुऱ्या प्रकटीकरणाचा आनंद समजसपणाच्या व प्रगल्भतेच्या नावाखाली दाबून ठेवण्यातला वैयर्थही दाखवून देतो. शरीराच्याच माध्यमातून शरीराच्या पार जाऊन अंतरात्म्याची ओळख

पटवणाऱ्या चैतन्यमय आनंदाचा अनुभव घेण्याची आकांक्षा बाळगतो. आदिम शक्तींच्या प्रगाढ एकरूपतेचा असा शब्दातीत अनुभव म्हणजे गुलबकावलीचं फूल गवसण्याचा दुर्मिळ भाग्यक्षण... असं म्हणताना शिवशक्तीच्या मीलनाचं विराट वैभव त्यांना समोर खुणावत असतं.

जगणे हे खूप गुंतागुंतीचे आहे. निवडीचे स्वातंत्र्य येथे आहे; परंतु मानवी स्वातंत्र्याला अनेक मर्यादांची चाकोरी जन्मापासूनच लाभलेली असते; ती निर्णयस्वातंत्र्याची गोची करते... त्यात पुन्हा काल हा घटक घोळ घालतो... आज जे चांगले वाटते, म्हणून करावेसे वाटते, तेच उद्या निरर्थक वाटू लागते... तेव्हा निर्णयस्वातंत्र्याच्या निरर्थकपणाचं ओझं न बाळगता, प्रत्येक क्षण आनंदमय करायचा हाच ध्यास आयुष्याला सुफळ संपूर्ण बनवील असा पोक्त निष्कर्षही 'निर्णयस्वातंत्र्य- इसके सिवा जाना कहाँ' यासारख्या लेखातून त्या पुढे ठेवतात. 'सूर्य पाहिलेला माणूस- सॉक्रेटिस' या लेखात सत्याचा शोध हाच ध्यास घेणाऱ्या सॉक्रेटिसच्या निखळ निर्भयतेचे दर्शन घडवले आहे...

रवींद्र पिंगे यांनी आपल्या प्रस्तावनेत अंजली कुलकर्णींचं ललितलेखन समकालीन लेखिकांपेक्षा वेगळे व वेगळ्या धावपट्टीवरचे आहे असे म्हटले आहे. ते कोणाही वाचकाला पटायला हरकत नाही. तत्त्वज्ञानाच्या आणि समाजशास्त्राच्या 'ॲकॅडमिक' अभ्यासाची जोड मिळाली तर अंजली कुलकर्णी यांच्या चिंतनाच्या कक्षा अधिक विस्तृत आणि काटेकोर होऊ शकतील. छोटेखानी स्फुट ललितलेखांच्या मर्यादेत होणारी त्यांची घुसमट त्यामुळे थांबू शकेल. ही धावपट्टी लांबपल्ल्याच्या उड्डाणासाठी आहे; हे सूचित करणारा हा संग्रह आहे.

❖❖❖

(संभ्रमाच्या पाण्यात गटांगळ्या : अंजली कुलकर्णी
अक्षरमानव प्रकाशन, राष्ट्रभूषण चौक,
९५९ शुक्रवार पेठ, पुणे २.
पृष्ठे १३३, एकशे दहा रुपये)

**शंकर सारडा**
ई-१० पाटील रिजन्सी
१५ एरंडवणे, पुणे ४
फोन : २५४२२२२३, ९८२३२६१०२३

---

पान क्र. २४ वरून पुढे चालू...

अंतर्मुखही करते. त्या निमित्ताने अनेक विषय चर्चेला येतात, दोन्ही अंगाने चर्चा होते आणि चिंतनासाठी विचार मिळतात. चित्रपटाच्या निमित्ताने या विषयाचे लेखन झालेले असले तरी चित्रपटातल्या गजबजाटाप्रमाणे मूळ विषय हरवत नाही. या चित्रपटात जसे आशय सूत्राच्या बाबतीत एक भान राखले गेलेले आहे; तेच लेखिकेने आपले चित्रपटातले अनुभव लेखनातून मांडताना राखलेले आहे. त्यामुळे कुठेही विस्कळीतपणा जाणवत नाही.

चित्रपट किंवा नाट्यक्षेत्रात आयुष्यभर कार्यरत असणाऱ्यांनी आयुष्याच्या मावळतीला आपले अनुभव आत्मचरित्रातून मांडलेले आहेत. अशी विपुल आत्मकथनं मराठी साहित्यात आहेत. पण एकाच कलाकृतीच्या सान्निध्यात आलेल्या अनुभवांची मांडणी करणारी जी मोजकी, दर्जेदार पुस्तकं आजपर्यंत उपलब्ध आहेत. त्यात 'वॉटर आणि मी' या पुस्तकाला वरचे स्थान द्यावे लागेल यात शंका नाही.

❖❖❖

**प्रा. मिलिंद जोशी**
बी १-१२, रविराज टेरेस,
सुखसागर नगर,
कात्रज, पुणे ४११ ०४६
फोन (०२०) २६९६३५०९, ९८५०२७०८२३

**वॉटर आणि मी**
ले. : डॉ. विदुला जवळगेकर
स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे
पृष्ठे १५६, किंमत १३० रु.



अनुक्रमणिका

# परदेशातील लेखिकांचे ललित-ग्रंथ

डॉ. ज्योत्स्ना आफळे

परदेशी, भौतिक प्रगतीच्या लाभात रमलेले, भारतीय मन स्वदेशी जुनेर त्यालेल्या मातृसंस्कृतीपासून कळत-नकळतपणे दूरत्व स्वीकारते. हे दूरत्व सांधण्यासाठी परदेशी सुखसंपन्न घरात एक 'इंडिया कॉर्नर' जपण्याचा केविलवाणा प्रयत्न करते. माहेरची ओढ असलेल्या आणि अपरिहार्य म्हणून सासरी रमणाऱ्या स्त्री-सुलभ दृष्टीकोनातून डॉ. ज्योत्स्ना आफळे यांनी प्रामुख्याने परदेशातील लेखिकांच्या ललित-लेखन ग्रंथांचा करून दिलेला परिचय वाचकांना अंतर्मुख करील असाच आहे. - संपादक

मराठी माणसाची प्रतिमा अतिशय बुद्धिवान, सरळमार्गी, चाकोरीबद्ध जीवन जगणारा, सुरक्षिततेच्या चौकटीत राहणारा अशी आहे. असा हा माणूस आता नोकरी-व्यवसाय, शिक्षणाच्या निमित्ताने जगाच्या कानाकोपऱ्यात जाऊन पोहोचलेला आहे. प्रामुख्याने अर्थार्जनासाठी, शैक्षणिक संधीसाठी परदेशात गेलेल्या या मराठी समाजाने त्या त्या देशाच्या आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक व काही प्रमाणात राजकीय क्षेत्रातही आपले स्थान निर्माण केले आहे. अनेक अर्थांनी त्या देशाच्या प्रगतीला, समृद्धीला हातभार लावला आहे. परदेशात राहणाऱ्या लेखक-लेखिकांनी तेथील कौटुंबिक, सामाजिक, राजकीय जीवनचे चित्र आपल्या ललित लेखातून व्यक्त केलेले आहे. यामध्ये विद्युल्लेखा अकलूजकर यांचे 'मेरा जूता है जापानी (१९९०)', 'यथा काष्ठं च काष्ठं च (१९९९)', 'ॲपलची पाने' इ. शोभा चित्रे यांचे, गोठलेल्या वाटा', 'पानजळीच्या आठवणी' (१९९४), 'गौरी, गौरी तू कुठं आलीस' (२०००) इ. अजिता काळे यांचा 'देशांतरीच्या गोष्टी सांगता' (१९९९), वर्षा पुराणिक यांचे 'फणसवाडी ते फिलाडेल्फिया' (१९९३), मीना प्रभू यांचे 'माझं लंडन', मोनाली फाटक यांचे 'अनामिका परदेशी', हेमा देवरे यांचे 'विश्व विदेश सेवेचे', उषा गडकरी यांचे 'पश्चिमेच्या वृक्षाला पूर्वेची ओढ' (१९९१), प्रतिभा रानडे यांचे 'अफगाण-डायरी' (१९९२), मुकुंद सोनपाटकींचे 'तमसा तटाकी', नानासाहेब गोरे यांची 'पिट्सबर्ग डायरी', अशी पुस्तके प्रकाशित झालेली आहे. हेमा देवरे, उषा गडकरी, प्रतिभा रानडे, मुकुंद सोनपाटकी, नानासाहेब गोरे या लेखकांनी परदेशात काही वर्षे वास्तव्य करून भारतात परत आल्यानंतर आपले अनुभव शब्दवद्ध केलेले आहेत.

भारतीय जीवनशैली आणि पाश्चात्त्य जीवनशैली यांमधील तफावत शोभा चित्रे, विद्युल्लेखा अकलूजकर आणि मोनाली फाटक यांच्या लेखनातून दिसून येते. एखादा अनुभव जेव्हा भारतात घेतला जातो, आणि तोच अनुभव जेव्हा अमेरिकेत घेतला जातो, तेव्हा त्यात भावनिकदृष्ट्या अंतर पडते; हे विद्युल्लेखा अकलूजकर यांनी दिलेल्या साध्या पेरूच्या उदाहरणावरून स्पष्ट होते. त्यांना एका डिपार्टमेंटल स्टोअरमध्ये पेरू दिसतात, तेव्हा त्यांचे भारतीय मन म्हणते, ''चार चाकाच्या हातगाडीवर पेरूच्याच पानांच्या गादीवर पडलेली आपल्याकडच्या रस्त्यावर दिसणारी ताज्या पेरूची उघडी रास; आणि कृत्रिम प्रकाशात वातानुकूलित दुकानातल्या हिरव्या कागदांच्या तुकड्यावर पांढुरक्या पिशवीत बंदिस्त करून ठेवलेल्या परदेशी पेरूंचा हा केविलवाणा कळप, यांच्यात महदंतर होते.''

तसेच एका दुकानात दगड विकायला ठेवलेले असतात. एका दुकानात गाईच्या शेणापासून तयार केलेले ससा व कासव दिसून येते. अमेरिकन लोक पैसे मोजून या वस्तू विकत घेताना दिसून येतात. ज्या गोष्टींची किंमत भारतात शून्य आहे त्याच गोष्टी अमेरिकेत मूल्यवान आहेत, हे त्यांनी दर्शवून दिलेले आहे. भारतीय पोषाखाचाही अमेरिकेत फायदा होतो, हे दिसून येते. विद्युल्लेखा अकलूजकरांनी लिहिले आहे की, 'व्हँकूव्हरहून सिॲटलला जाताना मी साडीचोळी नेसून 'भारतीय नारी' बनून गेले की, सरहद्दीवरचा अधिकारी सरळ गाडी न तपासता सोडून देतो; आणि तीच मी निळी जीन्स आणि एखादा टॉप अशा विद्यार्थीवेषात असते,

तर सरहद्दीवर आमच्या बॅगा तपासल्या जातात.

शोभा चित्रे यांनी अमेरिकेतल्या भारतीय लोकांसंबंधी आपली निरीक्षणे नोंदवली आहेत. त्यांच्या मते वयाची २५ वर्षे भारतात राहिलेली मुले अमेरिकेत आल्यावर बदलतात. इथल्या समाजजीवनाशी ती पटकन् जुळवून घेतात. पण येथून पुन्हा भारतात गेल्यावर मात्र ती रूजू शकत नाहीत. ज्या मातीत जन्म घेतला ती त्यांना परकी वाटू लागते. अमेरिकेत जाण्यासाठी काही मुले गैरमार्गाचा अवलंब करतात. काही मुली वयात खूप अंतर असलेल्या अमेरिकन मुलाशी लग्न करतात. भारतातील काही डॉक्टर झालेल्या बुद्धिमान मुली अमेरिकेतल्या सुमार बुद्धीच्या मुलाशी लग्न जुळवतात. कुणी अमेरिकेतल्या मुलाशी लग्न करून ग्रीनकार्ड मिळवतात आणि ते मिळाले की घटस्फोट घेतात. कुणी ग्रीनकार्ड मिळवण्यासाठी स्वतःच्या आईवडिलांची नावे बदलून अमेरिकेतल्या चुलत-मावस भावांची नावे लावतात. याचा वेध शोभा चित्रे यांनी आपल्या लेखांतून घेतला आहे. यावरून असे दिसून येते की, भारतीय मुलांना अमेरिकेचे जबरदस्त आकर्षण आहे. अमेरिकेत जाता यावे म्हणून स्वतःची नीतीमूल्येही पायदळी तुडवली जात आहेत.

मोनाली फाटक यांनी अमेरिकेत गेलेल्या मराठी माणसाची कशी 'तळ्यात-मळ्यात' अवस्था असते हे दर्शविले आहे. भारतात राहताना अमेरिकेतल्या आधुनिक जीवनशैलीची हौस असते, ओढ असते. पण अमेरिकेत गेल्यावर मात्र आपले पारंपारिक सणवार, पूजाअर्चा, संस्कृत श्लोक, मराठी संगीत वगैरे सगळे किती चांगले आहे, याचे कौतुक चालते. या विसंगतीचा त्यांनी नेमकेपणाने निर्देश केलेला आहे.

भारताबद्दल ओढ वाटणे, आपल्या गावाची आठवण येणे, गावाकडच्या काही गोष्टींबद्दल व्याकुळ होणे हे शोभा चित्रे आणि विद्युल्लेखा अकलूजकर यांच्या लेखनातून जाणवते. शोभा चित्रे यांना प्रत्येक वेळी भारतात आल्यावर आपलेच गाव आपल्याला अनोळखी परके सर्वस्व हरवून गेल्यासारखे वाटते. विद्युल्लेखा अकलूजकरांना भारतातून तिकडे गेल्यावर एक प्रकारचा अस्वस्थपणा येतो. कारण भारत आणि अमेरिका या दोन्ही देशात माणसांच्या जगण्याच्या ज्या तऱ्हा आहेत, त्यात कमालीची तफावत आहे. हे सगळं जाणवल्यावर आपण भारतातील लोकांसाठी काहीतरी करायला हवे आहे; असे त्यांना वाटत राहते. अमेरिकेतला 'पंपकिन पाय' हा खाद्यप्रकार खाताना शोभा चित्रे यांना आजीच्या, आईच्या हातचे निनावे आठवते. यावरून 'पंपकिन पाय' ही देशी निनाव्याची परदेशी आवृत्ती आहे हे दिसून येते. भारतातून गेलेल्या पाहुण्यांकडे बघण्याचा दृष्टीकोनही बदललेला दिसून येतो. पाहुण्यांच्या रूपाने आपल्या देशाशी जवळीक साधण्याचा प्रयत्न केला जातो. आपली आपल्या भाषेविषयीची, साहित्याची, कलेची, संस्कृतीची भूक या पाहुण्यांच्या सहवासात भागवली जाते. अमेरिकेत प्रत्येकाला स्वतःचे आयुष्य हवे असते. प्रत्येकाने प्रत्येकाचे स्वातंत्र्य जपायचे असते. प्रत्येकाच्या खाजगीपणाच्या कल्पना वेगळ्या आहेत. हे अमेरिकन तत्त्व आहे. पण भारतीय संस्कृती वेगळी आहे. नवऱ्याच्या आयुष्यात स्वतःला समर्पित करून दोघांनी एक मनाने जगायचे- ही भारतीय मनाची बैठक आहे. यावर शोभा चित्रे यांनी मत व्यक्त केले आहे की, अमेरिकेत गेल्यावर आयुष्य बदलून जाते. तिथले मोकळे वातावरण अंगवळणी पडायला वेळ लागतो. आपण बरोबर आणलेले संस्कार आणि इथले आयुष्य यात मनाची फरफट होते. याचा परिणाम मनावर होतो. परक्या वातावरणात रूळताना अनेक गोष्टींचे संदर्भ बदलतात, जगण्याला वेगळे अर्थ मिळतात.

खूप वर्षे अमेरिकेत राहिलेल्या अजिता काळे यांनाही पूर्वीचा भारत आणि आत्ताचा भारत यात फरक वाटतो. अमेरिकेतल्या सुखसोयी, स्वातंत्र्य, संधीची विपुलता, ज्ञान मिळविण्याचे असंख्य आणि सहज उपलब्ध असणारे मार्ग, त्यांना सवय झालेली आहे. त्यामुळे भारतातील गर्दी, लांचलुचपतीचा सुळसुळाट, बेपर्वाई, आळशीपणा यांच्यासमोर अमेरिकेतल्या दैनंदिन जीवनातला आनंद विरोधाने अधिकच उठून दिसतो आहे.

अमेरिकेतून भारतात, आपल्या मायभूमीला परतण्याचे विचार एकाही लेखिकेच्या लेखनातून आलेले

नाहीत. महाराष्ट्र ही आपली जन्मभूमी असली तरी आता अमेरिका हीच आपली कर्मभूमी आहे, असे मत व्यक्त केलेले आहे. विद्युल्लेखा अकलूजकर लिहितात की, भारत आणि अमेरिका दोन्हीकडे जवळपास एकसारखीच वर्षे वास्तव्य झाल्यावर समतोल दृष्टीने कोणत्याही घटनेकडे बघता येऊ लागले; आणि दोन्ही काठांना धरून वाटणाऱ्या नदीचा संथपणा, तृप्ती आणि वाहतेपणा संवयीचा झाला आहे.

खूप वर्षे अमेरिकेत वास्तव्य केलेल्या मोनाली फाटकही कबुली देतात की, आता हेच माझे घर आहे. हा देश आता परका वाटत नाही. इथले ख्रिसमस, ईस्टर, कॅंपिंग, शोअर... सगळे अंगवळणी पडले आहे. भारताची ओढ वाढते पण ती ओढ सासरी गेलेल्या मुलीच्या ओढीसारखी आहे. सासरी गेलेल्या मुलीला माहेरची ओढ वाटली तरी सासर हेच माझं घर जसं वाटते तसे हे आहे.

शोभा चित्रे यांनाही अमेरिकेतून परत यावेसे वाटत नाही. कारण पैसा, शिक्षण, कामाची पद्धत, विचारांची पद्धत, व्यवस्थितपणा, स्वच्छता, स्वातंत्र्य हे इतर देशांच्या तुलनेत-अमेरिकेत अधिक चांगले आहे. अमेरिकेचे नागरिकत्व घेताना जी उलटसुलट विचारांची वादळे मनात घोंगावली, त्याचे यथार्थ वर्णन शोभा चित्रे यांनी केलेले आहे. अमेरिकेचे नागरिकत्व स्विकारताना त्यांच्या मुलांनी उपस्थित केलेला प्रश्न विचार करण्यासारखा आहे. ती विचारतात की, जर अमेरिका आणि भारत यांच्यात युद्ध झाले तर बाजू कुणाची घ्यायची ? 'इंडियन' आहोत म्हणून 'इंडिया'ची की अमेरिन सिटीझन आहोत म्हणून अमेरिकेची ?

या प्रश्नावर शोभा चित्रे यांनी असे मत व्यक्त केले आहे की, भारतात वाढलेलो, जन्मलेलो आपण; आणि इथे जन्मलेली, वाढलेली आमची मुले यांत केवळ एका पिढीचे नव्हे, तर दोन देशातील विभिन्न आचार-विचारांचे, विभिन्न संस्कृतीचे अंतर पडलेले आहे. अमेरिकेत गेलेल्या भारतीयांची पुढची पिढी कशी असेल याचे चित्र येथे दिसून येते.

अमेरिकेत गेलेले भारतीय तेथे भारतीय मनाने जगतात पण त्यांच्या मुलांचा त्यांच्यापुढे मोठा प्रश्न उभा राहिलेला आहे. तिथे जन्मलेल्या, शिक्षण घेतलेल्या, रूजलेल्या, वाढलेल्या मुलांची परिस्थिती खूप वेगळी झाली आहे. त्यांना तोच देश, तीच संस्कृती आपली वाटते. त्यांना इंग्लिश हीच मातृभाषा वाटते. अमेरिकन मुलांबरोबर भारतीय मुली 'डेटींग'ला जात आहेत. त्यांच्याशी लग्नेही करत आहेत. त्या समाजाशी ती मुले एकरूप झाली आहेत. त्यांची मुले आता भारतीय मातीत रूजणार नाहीत. मोनाली फाटक लिहितात, "अमेरिकेतले आधुनिकीकरण चर्चा करायला चांगले वाटते. पण ते जेव्हा मुलांच्या रूपाने घरात येते, तेव्हा त्यांच्याशी जमवून घ्यायला अवघड जाते."

अजिता काळे यांना प्रथम अमेरिकेत आल्यावर काही वर्षे राहून पुन्हा परत भारतात जावे असे वाटत होते. पण एकदा तेथे स्वतःचे विश्व निर्माण केल्यावर परतीची वाट बंद केली गेली. त्या लिहितात, "आपल्या तरुणवयात आपण आपल्या आईवडिलांना सोडून येथे आलो; आणि त्यांच्या आठवणींनी कित्येक वर्षे तळमळण्यात गेली. आता आपली मुले मोठी झाली की त्यांना इथे सोडून आपण परत भारतात जायचं आणि पुन्हा मुलांसाठी झुरायचं... सगळे पर्याय कठीणच आहेत." अजिता काळे यांच्या विचारातून हेच दिसून येते की, सुखसमृद्धीत जीवन जगत असतानाही माणसाला आपल्या माणसांची ओढ असते. घरापासून एवढ्या दूर आल्यानंतर मागे ठेवलेली नातीगोती आणि त्यांचे भावबंधही अस्वस्थ करतात.

'पानगळीच्या आठवणी' या लेखसंग्रहातून शोभा चित्रे यांनी दूर राहिलेल्या नातेसंबंधांचा शोध घेतला आहे. लांब दूरवर अमेरिकेत जीवन जगताना भारतात राहणाऱ्या वृद्ध सासूसासऱ्यांच्या आणि आईवडिलांच्या अनेक आठवणींनी त्यांना बेचैन व्हायला होते. त्यांच्या मृत्युच्या वार्ता धक्का देणाऱ्या ठरतात. जवळच्या माणसाच्या मृत्यूसमयी त्याच्याजवळ नसताना होणारे दुःख खूप मोठे असते. वर्षा पुराणिक यांनीही अशीच खंत व्यक्त केली आहे की, आईवडिलांची अखेरच्या क्षणी भेट होत नाही, हे दुःख आयुष्यभराचे होते, हा सल कायम मनात राहतो. एकीकडे सुखसमृद्धी आणि दुसरीकडे भावनिक घुसमट असे दोन स्तरांवरचे जगणे

येथे दिसून येते.

मोनाली फाटक अमेरिकेत मतिमंद मुलांच्या संस्थेत काम करत होत्या. या मानसिक व्यंग घेऊन आलेल्या मुलांबरोबर काम करताना आलेले अनुभव त्यांनी लिहिलेले आहेत. दारू, सिगारेट, कोकेन, ड्रग्ज यांच्या आहारी गेलेल्या, शरीरविक्रम करणाऱ्या, लहान वयात गर्भवती होणाऱ्या एड्सची लागण झालेल्या, जन्माला येणाऱ्या मुलांना टाकून देणाऱ्या, त्यातून त्या मुलांच्या पुनर्वसनाचे प्रश्न निर्माण करणाऱ्या अनेक मुलींच्या समस्यांच्या कहाण्या मोनाली फाटक यांनी लिहिलेल्या आहेत. हे सगळे वाचताना कुटुंबसंस्थेचा पाया किती ढासळलेला आहे, हे दिसून येते. तसेच सिंगल पेरेंट्सची संख्याही खूपच वाढलेली आहे हे कळून येते.

अजिता काळे यांनीही गेल्सबर्ग मध्ये संततीनियमन केंद्र सुरू केले होते. त्यासंबंधीचे अनेक प्रश्न हाताळले होते. परक्या देशात जाऊन त्यांनी एक चांगले काम केलेले होते. या कामामुळे अनेक स्त्रिया संपर्कात आल्या होत्या. अलिशान घरांमध्ये राहणाऱ्या, सुंदर केशभूषा आणि वेशभूषा केलेल्या अनेक स्त्रियांची दुःखे त्यांनी आपल्या लेखातून वर्णिली आहेत. बाई अमेरिकेसारख्या प्रगत देशातील असो; नाही तर महाराष्ट्रातील एका कोपऱ्यातल्या आडगावातील असो, तिच्या व्यथा, वेदना, यातना सर्वत्र सारख्याच आहेत.

वर्षा पुराणिक यांच्या मते एखाद्या देशातील नुसत्या प्रसिद्ध इमारती पाहून देश पाहिला असे होत नाही. तर त्या लोकांबरोबर त्यांच्यासारखे जगले तरच तो देश कळतो. या त्यांच्या मताची प्रचीती त्यांच्या लेखनातून मिळत जाते. वर्षा पुराणिक यांनी अमेरिकेत अनेक ठिकाणी नोकऱ्या केलेल्या आहेत. मदर इंडियाचे ऑपरेशन डिपार्टमेंट, स्टेट बँक ऑफ इंडिया, वेस्टींग हाऊस, इलेक्ट्रिक, मतिमंदांची संस्था, अशा अनेक ठिकाणी घेतलेल्या अनुभवांचे चित्रण त्यांच्या लेखनातून आलेले आहे.

उषा गडकरी यांचा अमेरिकन जीवन पद्धतीकडे पाहण्याचा दृष्टीकोन वेगळा आहे. त्यांच्या मते जर अमेरिकेत राहायचे ठरले आहे; तर अमेरिकेचे नागरिकत्व घेऊन टाकायला हवे. भारत की अमेरिका अशी 'तळ्यात-मळ्यात' अवस्था असू नये. अमेरिकेत गेल्यावर त्यांनी अमेरिकेचा इतिहास, अमेरिकन लोकांची संस्कृती यांचा अभ्यास केलेला आहे. चीन, रशिया, जपान, भारत, युरोप वगैरे देशातून अमेरिकेत लोक कसे आले, त्यांचे प्रमाण किती टक्के आहे. त्यांनी आपली संस्कृती अमेरिकेत कशी टिकवली आहे, याचा उषा गडकरी यांनी अभ्यास केलेला आहे त्याचे निष्कर्ष आकडेवारीनिशी दिलेले आहेत. तसेच त्यांनी 'अमुआबा' मंडळ स्थापन केले आहे. 'अमुआबा' म्हणजे 'अमेरिकेत गेलेल्या मुलांचे आईबाबा' होय. अमेरिकेत गेलेल्या मुलांचे आईवडील भारतात असतात. कधी मुलांची पत्रे येत नाहीत. मग काळजी वाटते. तसेच कधी त्यांना मदतीची आवश्यकता असते. त्यांच्यासाठी हे मंडळ काम करते. उषा गडकरी यांचा हा अतिशय चांगला उपक्रम आहे. त्यांच्या लेखसंग्रहाचे 'पश्चिमेच्या वृक्षाला पूर्वेची ओढ' हे नावही अर्थपूर्ण आहे.

डॉ. मीना प्रभु यांचा 'माझं लंडन' हा लेखसंग्रह स्थलवर्णनात्मक आहे. प्रथम भारतीय मनाने वावरणाऱ्या मीना प्रभु हळूहळू लंडनकर कशा बनत जातात याचे प्रत्ययकारी चित्रण येथे आले आहे. लंडनमध्ये डॉक्टर म्हणून काम करताना आलेले अनुभवही त्यांनी वर्णिले आहे. हे लंडन 'माझं' आहे असे म्हणण्याइतकी जवळीक त्यांच्या पुस्तकांतून दिसून येते. लंडनमधल्या कित्येक जगप्रसिद्ध गोष्टींबद्दल, स्थलांबद्दल, व्यक्तींबद्दल मीना प्रभुंनी अत्यंत जाणकारीने माहिती दिली आहे. लंडन हे ऐतिहासिक शहर आहे. त्याला अनेक सांस्कृतिक परिमाणे लाभलेली आहेत. लंडनचा शेकडो वर्षांचा इतिहास इथे वाचायला मिळतो. लंडनमधली टेम्स नदी, तिच्यावरचा लंडन ब्रिज, शेक्सपिअरचे ग्लोब थिएटर, टेम्स नदीतून सैर करताना लागलेले ठिकठिकाणचे पूल, वेस्टमिन्स्टर पीअरवरून सुटणाऱ्या बोटी, ऋतुचक्राचे अनोखे फेरे, लंडनमधली नाट्यसृष्टी, चित्रकार, त्यांच्या कलाकृती, साहित्य, संगीत, शिल्पकला, उद्याने, प्रासाद, कॅथीड्रल्स, ट्यूब-रेल्वे, राजरस्ते, बसेस, टॅक्सी ड्रायव्हर, बाजारपेठा, दुकाने, हॉटेल्स्, 'रेस्टॉरंटस्' या

साऱ्यांचा मीना प्रभुंनी तन्मयतेने परिचय करून दिलेला आहे.

त्यांच्या लेखनातून लंडनचा इतिहास भूगोल तर कळतोच पण 'लंडनकर' कसा आहे याचाही वेध त्यांनी घेतलेला आहे. त्यांच्या मते लंडनकर विश्वासू, मृदुभाषी, न्यायप्रिय, हरहुन्नरी सन्मित्र आहे. त्याची नम्रता, सौजन्य प्रथमदर्शनीच ध्यानात येते. 'आपण बरे; की आपले काम बरे !' अशी त्याची वृत्ती आहे. तो इतरांना मदत करतो; पण इतरांच्या भानगडीत तो नाक खुपसणार नाही. 'माइंड युवर ओन बिझनेस' हे त्याचे ब्रीद असते. घराभोवतीची बाग हा त्याचा जीव की प्राण असतो. लंडनमध्ये प्रत्येकाला कसला न कसला छंद असतोच. कुणाला कसा छंद असेल याला काही धरबंद नसतो. म्हणजे माळी नाटक लिहितो. तंदुरूस्त केल्यावर डॉक्टर उरलेल्या वेळात अँटिक फर्निचर दुरुस्त करीत असतात. लंडनकरांच्या अशा अनेक गुणवैशिष्ट्यांचा आढावा मीना प्रभुंनी घेतलेला आहे, मीना प्रभुंचे लेखन कधी संशोधनाच्या अंगाने जाते; तर कधी काव्यात्मता, कधी मिस्किल छटा त्यात दिसून येतात. त्यांची रसिकता, इतिहासाचे ज्ञान, लंडनविषयीची आपुलकी तसेच भारतीय मन हे सर्वच त्यांच्या लेखनातून प्रकट झालेले आहे.

'अफगाण डायरी' हा प्रतिभा रानडे यांचा लेखसंग्रह आहे. अफगणिस्तानात प्रतिभा रानडे यांचे काही काळ वास्तव्य होते. त्या काळात त्या देशाच्या राजकीय, सामाजिक क्षेत्रात ज्या काही घडामोडी झाल्या त्याचा वेध त्यांनी घेतलेला आहे. काळाच्या संदर्भात झालेले हे लेखन महत्त्वपूर्ण आणि अतिशय अभ्यासपूर्ण असे हे लेखन आहे. अफगणिस्तानातील राजघराणी, तेथील राजांची विचारसरणी, इस्लामी कायदेकानू, मुल्लामौलवींचे अधिकार, अफगाणी लोकांची मानसिकता, आचारविचार यांचे विवेचन या संग्रहातून केलेले आहे. भारतीय सीमेवरच्या अफगणिस्तानात घुसून कम्युनिस्ट रशियाने तो देश घशात घातला. हे आक्रमण व लालक्रांती घडत असताना प्रतिभा रानडे काबूलमध्ये होत्या. त्यावेळी घडत असलेल्या भीषण घटना त्यांच्या अफगाण डायरीमधून आलेल्या आहेत. अफगणिस्तानचे पाकिस्तानशी राजकीय संबंध चांगले नाहीत; पण दोघांचे धर्म मुस्लीम म्हणून त्यांना पाकिस्तानी माणसांबद्दल प्रेम आहे. याउलट भारताशी राजकीय संबंध चांगले; पण आपण हिंदू म्हणून त्यांना भारतीय माणसांबद्दल प्रेम नाही, असे निरीक्षण त्यांनी नोंदविलेले आहे.

'विश्व-विदेश-सेवेचे' हा हेमा देवरे यांचा लेखसंग्रह आहे. त्यांचे पती सतीश देवरे यांनी भारतीय राजदूत म्हणून अनेक देशात नोकरी केली आहे. त्यामुळे हेमा देवरे यांनी अनेक देशात वास्तव्य केले होते. त्या-त्या देशातील अनुभवविश्व त्यांनी त्यांच्या लेखसंग्रहातून प्रकट केले आहे. या लेखनातून परदेशातील भारतीय वकीलातीचे जग समोर येते. आपल्या विदेशातील वकिलातींना राजकीय संबंधांपासून ते आर्थिक आणि सांस्कृतिक क्षेत्रांमध्ये सुद्धा कसे काम करावे लागते, तसेच राजदूताची कर्तव्ये काय असतात, त्यांचे कामकाज कसे चालते याची वैशिष्ट्यपूर्ण माहिती हेमा देवरे यांनी दिलेली आहे. त्या त्या देशातील समाजजीवन आणि संस्कृती याचे विवेचन त्या करतातच पण त्याचबरोबर राजकीय परिस्थितीचाही वेध घेतलेला आहे. अमेरिकेतील वॉशिंग्टन येथे असताना तेथील वर्णद्वेषाचा संघर्ष, काळ्या लोकांच्या नागरी हक्कांसाठी झगडणारा मार्टिन ल्यूथर किंग, १९६८ मध्ये रॉबर्ट केनेडी यांची लॉस एंजेलिसमध्ये झालेली निर्घृण हत्या, व्हिएतनाम युद्धाचे अमेरिकेतील पडसाद, अमेरिकन अंतराळवीरांनी चंद्रावर ठेवलेले पाऊल, भारत, अमेरिका व पाकिस्तान यांचे परराष्ट्र धोरण, बर्लीन भिंत पाडून पूर्व जर्मनी आणि पश्चिम जर्मनी यांचे झालेले एकीकरण, जिनीव्हा-स्वित्झर्लंडमधील स्वीस-बँका, त्यांचे गुप्त व्यवहार, दक्षिण कोरिया-सिओलमधील ८६ सालचे आशियाई खेळ, ऑलिंपिक क्रीडा स्पर्धा या सर्वांचे तपशील हेमा देवरे यांच्या लेखनातून आलेले आहेत. त्या काळातील त्या देशाचे राजकीय आणि सांस्कृतिक चित्र त्यांनी दर्शविले आहे. असे हे लेखन सामाजिक दस्तऐवज होते.

मुकुंद सोनपाटकी यांचे इंग्लंडमध्ये बरीच वर्षे वास्तव्य होते. त्या काळातील इंग्लंडमधील सामाजिक,





अनुक्रमणिका

राजकीय परिस्थिती, इंग्लंडमधील भारतीय माणसे यांच्या संदर्भात ते लेखन करीत होते. त्यांचे लेख किर्लोस्कर, मनोहर, सोबत, पैंजण, विवेक, लोकसत्ता अशा दैनिकातून, मासिकातून प्रसिद्ध होत होते. १९६७ ते १९७९ या काळातील हे लेखन आहे. ते लेख त्यांच्या 'तमसा तटाकी' या पुस्तकात एकत्रित केले गेले आहेत. ब्रिटीश पार्लमेंटच्या निवडणुका कशा होतात याचे चित्र या लेखातून दिसून येते. लंडनमध्ये निवडणुकीची धमाल अशी दिसत नाही. भित्तीपत्रके नाहीत, मोठाले-फलक नाहीत, ध्वनिक्षेपकांवर गर्जना नाहीत. कॉर्नर मीटींग्ज नाहीत, सभाही नाहीत. हे चित्र मुकुंद सोनपाटकी यांनी दर्शविले आहे. आताची परिस्थिती बदललेली असेल पण काळाच्या संदर्भात, इतिहासाच्या संदर्भात सोनपाटकी यांनी वर्णिलेले तपशील महत्त्वाचे आहेत. २३ फेब्रुवारी १९७० रोजी लंडनच्या टेलिव्हिजनवर 'टेस्ट-ट्यूब बेबी' संदर्भात बातमी दिली गेली होती. यामुळे जगात खळबळ माजली होती. दोन्ही टोकांची मते मांडली गेली होती. याचे विवेचन मुकुंद सोनपाटकी यांनी केले आहे. १९७८ मध्ये इंदिरा गांधी जेव्हा लंडनला गेल्या तेव्हा तेथील भारतीय संस्थांचे, पक्षांचे कार्यकर्ते त्यांच्या विरोधी घोषणा देत होते. ब्रिटीश वृत्तपत्र प्रतिनिधींचाही इंदिराजींवर राग होता. त्यांच्या मुलाखतीच्या वेळी आणीबाणी, लोकशाहीची गळचेपी या विषयांवर तोंडसुख घेतले गेले. इतके सगळे विरोधी वातावरण असताना त्यांच्या बोलण्यात कुठेही आपण लादलेल्या आणीबाणीच्या परिस्थितीबद्दल पश्चात्ताप नव्हता. आपणावर होणाऱ्या कोर्ट-केसेसची भीती नव्हती. अगदी सहजतेने बाई इंग्लंडमध्ये संचार करीत होत्या. भारतातील राज्यकर्त्यांची प्रतिभा परदेशांत कशी आहे हे इंदिराजींचे तेथे स्वागत कसे झाले यावरून दिसून येते. भारताच्या राजकीय इतिहासाच्या दृष्टीने ही एक महत्त्वाची नोंद आहे. इंग्लंडमध्ये राहणाऱ्या पोलिओ झालेल्या ऑर्थर टर्नव्हस्कीने संपूर्ण भारत चाकाच्या खुर्चीत बसून पालथा घातला होता. 'अनबिटन ट्रॅक' हे त्याचे पुस्तक आहे. बाबा आमटे यांच्या आनंदवनात ऑर्थर गेला होता. बाबा आमटे सपत्नीक आनंदवनात कुष्ठरोग्यांच्या जखमा धुताना पाहून ऑर्थर गहिवरला होता. 'अनबिटन ट्रॅक'मधील शेवटची दोन प्रकरणे बाबा आमटे यांच्या कुष्ठरोग्यांविषयीच्या कार्यावर आहेत. दै. केसरीचे लंडनमधील वार्ताहर द. वि. ताम्हणकर, भारतातील राजदूत ना. ग. गोरे आणि अप्पासाहेब पंत यांच्या सहवासातील क्षणही लेखकाने टिपले आहेत. त्या काळातील भारताचे आणि लंडनचे जे काही सामाजिक, राजकीय, वैज्ञानिक चित्र होते, ते सोनपाटकी यांच्या लेखातून व्यक्त झालेले आहे.

कै. नानासाहेब उर्फ ना. ग. गोरे हे आपली मुलगी शुभा जोशी यांच्याकडे अमेरिकेत काही दिवस वास्तव्याला गेले होते. ९ सप्टेंबर १९८९ ते १० ऑगस्ट १९९० या काळातील तेथील मुक्कामात त्यांनी रोजनिशी लिहिली होती. ती 'पिट्सबर्ग डायरी' या नावाने प्रकाशित केलेली आहे. या काळात त्यांनी जे वाचन केले त्याचे चिंतनही या रोजनिशीतून आलेले आहे. तसेच पाहिलेली नाटके, हेमंत ऋतूतील निसर्गाचे लोभसवाणे रूप, अमेरिकेतील राजकीय आणि सामाजिक परिस्थिती यासंबंधीचे त्यांचे विचार रोजनिशीतून आलेले आहेत. अमेरिकन लोक म्हणजे उघडेनागडे श्रीमंत लोक आणि आपण भारतीय लोक म्हणजे संस्कृती संपन्न लोक हे दोन्ही गैरसमज आहेत, यातून आपल्याला शक्य तेवढ्या लवकर मुक्त झाले पाहिजे असे मत त्यांनी नोंदविलेले आहे. त्याकाळात अमेरिकेत इच्छामरणाच्या प्रश्नावर वादावादी सुरू होती. 'इच्छामरण' या सामाजिक शब्दापैकी 'इच्छा' या शब्दाला प्रधान स्थान देऊन कोणाची इच्छा प्रमाण मानायची असा वादाचा मुद्दा उपस्थित झालेला होता. याचे विवेचन त्यांनी केलेले आहे. त्यावेळी अमेरिकन सरकारने स्त्रीला गर्भपाताचा अधिकार दिला होता. ना. ना. गोरे यांनी त्यासंबंधी निषेध व्यक्त केला आहे. त्यांच्यातील समाज कार्यकर्ता जागा झाला आणि त्यांनी गर्भपाताचा अधिकार म्हणजे अनिर्बंध स्वैराचाराचा अधिकार मागणे होय, ''संयमासह स्वातंत्र्य आणि कर्तव्यासह अधिकार ही खऱ्या मुक्त समाजाची व्यवच्छेदक लक्षणे मानली पाहिजेत'' असे परखड मत त्यांनी नोंदवले आहे. ना. ग. गोरे यांच्या सामाजिक, चिंतनशील व्यक्तिमत्त्वाचे दर्शन होते.

'ट्युलिप्सच्या देशातून' हा अंजू व्हार्न वेर्श यांचा पत्रसंग्रह आहे. 'ट्युलिप्स' फुलांच्या बागा जिथे आहेत, त्या हॉलंड देशातून ही पत्रे आली आहेत. ही एका लेकीने म्हणजे अंजू व्हार्न वेर्श यांनी आपल्या आईला म्हणजे प्रसिद्ध कवयित्री संजीवनी मराठे यांना पाठविलेली पत्रे आहेत. जिव्हाळ्याने पाठवलेली ही पत्रे संजीवनीबाईंनी संपादित करून वाचकांच्या हाती दिली आहेत. असे हे पत्ररूप साहित्य आहे. १२ डिसेंबर १९७२ ते ३१ डिसेंबर १९९२ या वीस वर्षांतला हा पत्रात्मक प्रवास आहे.¨ जीवनाला प्रत्येक टप्पा येथे विशिष्ट तऱ्हेने नोंदला गेलेला आहे. सुंदर जीवन अधिक सुंदरतेने कसं जगावं हे शिकवणारी ही पत्रे आहेत. या पत्रातून अंजू व्हार्न वेर्श या परिपूर्ण व्यक्तिमत्त्वाचा परिचय तर होतोच. पण मायलेकींमधल्या नात्याचा गोफ किती विविध पदरी असतो हे दिसून येते. पुण्यात वाढलेली ही महाराष्ट्रीयन तरुणी एका डच तरुणाशी विवाहबद्ध होऊन हॉलंडमध्ये आपला संसार थाटते; आणि त्या संसारातील आनंदाचे, दुःखाचे, खेदाचे, हर्षाचे, हुरहुरीचे, बैचेनीचे असे अनेक प्रसंग आपल्या प्रत्येक पत्रातून व्यक्त करते. आपले पती ह्यूब यांच्याविषयी त्या लिहितात तेव्हा पतीपत्नीचे सहजीवन कसे असावे, याचे बोलके चित्र त्यातून स्पष्ट होते. त्या लिहितात, "हवा तसा जोडीदार मिळवायचा तर मायदेशाशी ताटातूट होणारच, ती सहन करायला हवी. दोघांपैकी एकाला असे होणारच हे समजून घेतले पाहिजे. स्वतःच स्वतःला जाणून घेण्याची, स्वतःला त्रयस्थपणाने निरखण्याची किमया अंजू व्हार्न वेर्श यांचे पाशी आहे. ह्यूबला अपराधी वाटू नये म्हणून माहेरची आठवण येते असे म्हणायचे नाही; अशी ताकीद त्या मनाला देतात. आपल्या जोडीदाराचा स्वभावधर्म, त्याचे आचार विचार, कार्यकर्तृत्व या सर्वांचा सखोल विचार करून त्यानुसार त्याच्याशी सुसंगत अशी आपली भूमिका कशी असेल, याचा विचार करून त्याच्याशी वागणाऱ्या अंजू व्हार्न वेर्श आपल्याला प्रत्येक पत्रातून भेटतात. एकाच वाक्यात सांगायचे तर आपल्या पाश्चात्य नवऱ्याशी अगदी भारतीय वळणाने आणि महाराष्ट्रीय मनाने संसार करणारी गृहिणी त्यांच्यामध्ये दिसते. पाश्चात्य सासरच्या मंडळींत रमणारी, संगीताची भोक्ती असलेली, चित्र-शिल्प या कलांमध्ये रस असणारी, मराठी साहित्याशी जवळीक साधणारी, ईश्वर तत्त्वांची जाणीव असणारी, निसर्गाचे विलोभनीय सौंदर्य टिपणारी. अशी त्यांची विविध रूपे पत्रातून व्यक्त झालेली आहेत. मनाच्या एका कोपऱ्यात आपले मूळ भारतीय आहे, ही जाणीवही त्या हळुवारपणे जपताना दिसतात. घराच्या एका कोपऱ्यात एक 'इंडिया कॉर्नर' करून त्यांनी आपल्या मायभूमीबद्दलच्या भावनेला मूर्त स्वरूप दिलेले आहे. आईला जिवलग मैत्रीण मानून तिच्याशी हृदयसंवाद करणाऱ्या अंजू व्हार्न वेर्श या पुस्तकातून दिसून येतात.

'अमेरिकेच्या अंगणी' हा नीलिमा कुलकर्णी यांचा लेखसंग्रह आहे. अमेरिकन लोकांच्या संपर्कात जीवन जगताना त्यांच्या आणि आपल्या विचारसरणीतले साम्य-विरोध त्यांनी दर्शविले आहेत. अमेरिका हा वेगवेगळ्या देशांमधून आलेल्या लोकांनी बनवलेला देश आहे. त्या-त्या देशाची सांस्कृतिक परंपरा घेऊन तिथले इंग्रजी बदलत गेलेले आहे. म्हणूनच भाषेचं आणि संस्कृतीचं कसे जवळचं नाते आहे हे नीलिमा कुलकर्णी यांनी अनेक उदाहरणे देत उलगडून सांगितले आहे. अमेरिकेतील वर्ल्ड ट्रेड सेंटरवर ११ सप्टेंबरला परदेशी दहशतवाद्यांनी हल्ला केला होता. तेव्हा तेथे जे काही विदारक दृश्य होते ते माणुसकीवरचा विश्वास उडायला लावणारे होते. तो विध्वंस भयानक होता. त्यामध्ये जी काही माणसे मृत्युमुखी पडली त्यांच्यासाठी, त्यांच्या नातेवाईकांसाठी, त्यांची मुलेबाळे, आईवडील यांच्यासाठी नीलिमा कुलकर्णी आणि त्याचे सहकारी यांनी खूप मदत केली. त्यावेळी अमेरिकन शासन आणि अमेरिकन जनता यांनी ही परिस्थिती कशी हाताळली याचे साद्यंत वर्णन लेखिकेने केले आहे. या पुस्तकातील हा 'राखेतून उठताना' लेख म्हणजे एक ऐतिहासिक नोंद आहे.

एकूणच परदेशात कायम वास्तव्य करून असलेल्या आणि काही काळ राहून आलेल्या या लेखक-लेखिकांनी त्या त्या देशाचे सामाजिक, सांस्कृतिक

(पान क्र. ३७ वर पहा

# केशव मेश्राम यांची कविता : 'अनिवास'

डॉ. किसन पाटील

वर्तमानातील सामाजिक, सांस्कृतिक आणि राजकीय संस्कृतीच्या भ्रष्ट एकारलेपणात जगण्याचा शाप घेऊन मानव जगत असतो. कवीमनाला यातून 'अनिवास' होऊन जगण्याची अनिवार्य ओढ जटायूसारखी जखमी होऊन देहान्ताची वाट पाहते. कवि केशव मेश्राम यांच्या सहाव्या कवितासंग्रहाचे हे परीक्षण अनेक संदर्भाने उल्लेखनीय आहे. - संपादक

लेखक, विचारवंत, समीक्षक, कवी आणि वक्ता म्हणून त्यांचं स्वतंत्र स्थान साहित्यात आहे. त्यांच्या कवितेचा एकूणच वेध घ्यायचा तर **उत्खनन, जुगलबंदी, अकस्मात, चरित, कृतकपुत्र** या पाच कवितासंग्रहांची भक्कम पार्श्वभूमी आहे. 'विद्रोही कविता' या संपादनातील दलित जाणिवेचा, परिवर्तनवादी विचारांचा आलेख वाचकांच्यासमोर अशा रहातो. कवितेतून व्यक्त होणारं कवीचं व्यक्तिमत्त्व आणि अनुभूती यादृष्टीने विचार करता केशव मेश्राम यांच्या 'अनिवास' मधील कवितेची अंतर्मुखता, कल्पकता, आत्मपरता, प्रवाही शब्दनिष्ठा, अनुभव निष्ठा आणि समाष्टीभिमुखता या दृष्टीकोनातून शोध घ्यावा लागतो. आपल्या मनोगतात कवीच्या आविष्काराच्या भूमिकेचा नेमका सूर सापडतो. ''माझ्या स्वतःच्या व्यक्तित्वाचे सगळे रंग बेरंग मला कवितेतून प्रकट करायला विशेष भावते. कविता लेखनात मनाचा कोंदलेला प्रवाह आपसूकच वाहता होतो.'' या कवितेतून २१व्या शतकाची स्पंदनं, जगातील विध्वंस विनाशाचे भयानक दृश्य, सर्वक्षेत्रात झपाट्यानं होणारी स्थित्यंतरे, राजकीय अस्थिरता, अशाही अवस्थेत टिकून असलेली लोकशाही, निधर्मीपणा - सर्वधर्मसमभावाची टिंगलटवाळी करणारे मध्यमवर्गी लोक, माणसाचं सतत होणारं अवमूल्यन, खाजगीकरण, उदारीकरण, जागतिकीकरणाचे परिणाम, समाजवास्तवाच्या अनुभूतीतून निरीक्षणात आलेलं भयानक-विदारक सत्य अशा सर्वच गोष्टींचा कवीनं घेतलेला वेध म्हणजे एका संवेदनशील विचारवंतानं टिपलेली ही विचित्रके, स्पंदने, यांचा आविष्कार आहे. कवीचे एकटेपण, अंतर्मुख चिंतनशीलता, भावावस्थेतून आलेली संवेदनशीलता 'अनिवास' मधून जाणवते.

**'नजर संतृप्तीची'** या कवितेतील मायेचा सुरकुतलेला अनाम हात, अलाबला घेऊन शब्दांना पाखरांचे पंख फुटले, आणि बापाच्या पाठमोऱ्या दराल्यातही दिसली संतृप्तीची नजर असं वर्णन करून आपल्या कौटुंबिक जिव्हाळ्याच्या आठवणी जागवण्याचं काम कवी करतो, बालपणीचा दारिद्र्याचा-विरोधाभासाचा काळ म्हणजे इतिहासाच्या काळ्यापटावरील घनगर्द शोकमग्नता होती असं वाटतं. तर आत्ताच्या प्रागतिक समृद्ध सन्मानाची तृप्तावस्था यांचा तौलनिक भावाधार कवीच्या आत्मनिष्ठेतून प्रकटतो. ही मानसन्मानाची अवस्था एका खडतर प्रवासाचा आलेख **'स्वागतविधी'**तून रेखाटला जातो. कधीकाळी सावलीही सहन न करणारी माणसं सध्या संकोचत का होईना भेटतात. यातून कवीला एका अगम्य कोलाहलाची आणि तरीही निखळ माणूसपणाची जाणीव होते.

*''जवळीक होती माझ्या लेखी त्यांनाच अज्ञात असणाऱ्या- त्यांच्यातल्याच स्नेह जोजवणाऱ्या अंतःस्थ माणसाची सरकून पुढे तरीही : देणार आहेच हात त्यांच्याही हातात विराम मिळायलाच हवा अधांतरीच्या स्वागत विधीला''* (पृ. १०)

स्वागत सोहळ्यातला कोरडेपणा, बेगडीवृत्ती, खोटे सोहळे, सांस्कृतिक उत्सव, शब्दांचे कारंजे, महीरपी रकाने, याची उबग आलेलं कवी-मन मोकळं होऊ इच्छिते. **'मोकळीक'** या कवितेतून कवीची मुक्त होण्याची मनीषा त्याच्या स्वच्छंदी आत्मचिंतनातली 'अनिवास' अवस्थाच वाटते. ''स्पर्शाने नाही उचंबळत मी : माफ कराल ना ?'' (पृ. ११) असा सरळ सवाल करून कवी आपली घुसमट प्रकट करतो. परंतु 'माणूस' म्हणून मिळणाऱ्या प्रेमामुळे पावलांना बळेबळेच रेटत

आणतो. उत्सवात सहभागी होतो. पोळलेल्या पावलांच्या गतकालीन स्मृतींनी, कडू-गोड आठवणींनी पोळूनही शेवटी जीवनाशी योग्य तडजोड स्वीकारून कवी आपला प्रांजळ भाव व्यक्त करतो.

*''आता झाली सवय : एकट निर्भत्सनेची... बरेच वाटते भाजत्या उन्हात राहातो चालतच जळक्या पावलांनी ही म्हणूनच चिरंजीवी वर्षावात''* (पृ. १२)

याच अवस्थेतल्या अनुभूतीची **'काळोख फुले'** प्रतिमारूप अवतरताना वेदनामय-नाकारलेल्या अवस्थेचे हितगुज करताना कवीला निरंगाचे उद्रेक दिसतात, वसुंधरेचे ढळलेले संतुलन, ऋतुचक्राची उलटापालट अशी निसर्गातील रूपे आणि वास्तव जगात शीतल 'काळोख फुलांच्या' व्यथावेदनांनी कवीला अस्वस्थता वाटते. **'संवाद तूट'** (पृ. १३) झाल्यावर थबकलेल्या-हरवलेल्या रात्रीतला स्वतःशी झालेला अबोला व्यक्त होतो. ''रात्रींशी संवादतूट झाल्यावर; यंत्रांसारखे मलूल दिवस'' भोगावे लागणारे कविमन आत्मसंवादी बनते. ही अवस्था'' ओल्यारस्त्यावरून रित्या मनाने सरपटणारी एक विस्कळीत सावली'' होते. ''त्या रस्त्यावरून खोलवर आसवांतून बरसणारी कोमटशी नवी ओल'' रूतत जाते. ही एकांतावस्था ''प्रियजनांनी नागवले... घरादारातून उठवले-नातलगांनीच घातला विषारी फास'' अशा देहभर हुंदके फुटलेल्या स्थितीत रूपांतरित होते. एक अनामिकाच्या **'तिठ्यावर'** भांबावून असलेला कवी मायेनं थोपटणारं कुणीच नाही म्हणून आवाजांच्या कोलाहलात हरवून जातो.

*''कधी कळलीच नाही : विचित्रशी गुंतागुंत... नात्यांची उमगली नाही भाषा : फिरत्या पहाटेच्या जात्यांची''* (पृ. १६)

अशी चिरंतनाची-शाश्वताची ओढ आणि सम्यक् जाणीव यामुळे 'ललकारी'तून सापडलेलं दिव्य जीवनाचं, स्वातंत्र्याचं गमक, आत्मशक्तीची प्रतीती आविष्कृत होते.

आयुष्याच्या ह्या प्रदीर्घ प्रवासात ऊन, वारा, थंडी सहन करावं लागतं. पर्यावरण आणि सामाजिक परिवेशातल्या अनुभूती कवितेत **'सकाळचे ऊनही'** सर्वांग भाजते; ही संवेदनशीलता घेऊन प्रकटते. आभाळ-फाटक्या गोधडी सारखं, झाडे-प्रेमभंग झालेल्या युवकांसारखी, माणसे-परक्यासिमेंटी घरात पुरलेली, आत्मदंग-शहरीजीवन ही महानगराची घाईगर्दी पाहून कवी व्यथित होतो. (पृ. १९) या आत्मदंग दुनियेत निःसंग होऊ पाहणारा कवी म्हणूनच 'अनिवास' स्वीकारतो काय ? ही जागृत संवेदना कवीच्या सर्जनशीलतेची साक्ष आहे.

महानगरी संस्कृतीच्या अंतर्गत व बाह्य स्वरूपातील बदलांची स्पंदनं टिपणारा कवी हा त्या घटनांचा साक्षीदार आहे. स्वस्थ पडलेलं शहर, अंधारानं भरभरून वाहणारं आभाळपात्र, टी.व्ही. डेकचा ध्वनी, पार्ट्यांचा गलबलाट, भांडण-रडारड, गजबजलेला प्लॅटफॉर्म, स्वस्तमस्त कामुक इशारे, बिनधास्त वाटप... पोलीस, कर्फ्युसारखे **'साक्षीस फक्त'** (पृ. २२) उरलेले शहर. ''कसा होणार या गर्दीच्या कहाणीचा ही शेवट ?'' असा अस्वस्थ करणारा प्रश्न- ''शहराची कवटी फुटण्याची वाट पाहणारी माणसं; निरर्थ झालेल्या संगणकाच्या वांझोट्या खुणा'' अशी प्रगती तर ''अंधार सरी : आभाळातून भरभरून कोसळतात'' ही दुःखाची अधोगतीची चाहूल यावर भाष्य करून महानगराच्या स्थितीगतीचा आलेखच कवी मांडतो.

दुसऱ्यांच्या खासगी गोष्टींबद्दल खूप बोलणाऱ्यांची अजिबात पर्वा न करता कवी त्यांना एक सम्यक् विचार सुचवतो. बोलणारांना **'मनसोक्त'** बोलण्याची (पृ. २३) मुभा देऊन कवी म्हणतो,

दादागिरीवाले, अड्ड्यावाले, दहशतवाले, दांडगाईवाले वाढले. ''माणसं मरू लागली... बेवारशी मरण... मुले चोळा मोळा... नातलग लोळा गोळा... दादागिरीवाले मस्त फिरतात गाड्यातून शेजाऱ्यांना त्यांच्या दहशतीची भीती वाटते.'' **हरवणूक** (पृ. २४) मधून ही स्थिती जाणवते. तर **'विस्तार'** (पृ. २६) मधून कवी 'माणूस' शोधण्याचा प्रयत्न करतो. त्यातही विषण्ण अवस्थेत उपरोधातून कवी म्हणतो-

''काहीही विचारण्याची चूक करू नये, हळवे मन गरम हवेत खोलू नये, पारंब्यांचे सर्प गळ्यात. अडकवलेला सांबभोळा माणूस मुळीमुळी शोधू नये.''

असा निर्वाणीचा सल्ला कवी देतो. जगाच्या विस्तारात 'माणूस' कुठे वाहून गेला ? माणुसकी कुठे विरून गेली? असा सवाल करतो (पृ. २७). असं असलं तरी कवीचा माणसाच्या जन्मजात चांगुलपणावर विश्वास आहे. **'कैदी'** या कवितेत गुन्हेगार कैद्याची कैफियत मांडली आहे. गुन्हेगाराला आपण नंबर देतो, त्याचं आयुष्य-तारूण्य जाळून तो जन्मठेप भोगतो. अनेक गुन्हेगार लब्ध प्रतिष्ठेत मात्र मस्त सत्ता-सुख उपभोगतात. कैदी हा एक कुटुंब वत्सल माणूस असतो. तो लाव्ह्यासारखा उसळणारा ज्वालामुखीच असतो. ''कोंभ-शेंडे... पाने वुंधे छाटलेल्या झाडांची अगतिक थबकण'' आणि ''उष्णतेत वितळणाऱ्या मनस्वी हिमनदीचे आक्रंदन'' अशी छाटलेल्या झाडाची, हिमनदीची प्रतिमा वापरून कवी अस्तित्व धोक्यात आलेल्या माणसांची उद्विग्नता मांडून जातो. (पृ. २८)

कोण डावं ? कोण उजवं ?... ठाऊक नाही. आपली सहचारिणी उमेदवान व टापटीपीची असून तिनं कवी मनाच्या हळव्या संवेदनशीलतेला योग्य साद दिली; योग्य मेळ जमला. ती एक स्त्री म्हणून जगाचा विचार न करता संततधार वाहणाऱ्या नदीच्या प्रवाहासारखी निसर्गदत्त सहचारिणी आहे. त्याबद्दलच्या भावना अशा व्यक्त होतात.

*''धार वाहते : पाण्याची... काळाची... मिटर कोणी लावत नाही... नुस्ती उमेद पुरते सहजीवनाला... पुरते लंगडते तर्कशास्त्र... वाट फक्त चालायची : येतात गावं... जातात गावं ठाऊक नव्हते तेव्हा ही... कोण डावं, कोण उजवं ?''* (पृ. २९)

धर्म, वर्ण, वंश, जात, सत्ता अशा वैविध्यपूर्ण संस्कृतीची स्पंदनंही तितकीच वेगवेगळी, प्रतीके आणि मुखवटे धारण केलेल्या वृत्तीच्या आत दडलेल्या विकृतींची चिकित्सा करताना कवी क्रांतिकारक होतो. भुरळणारी मने आणि काळवंडणारी तप्त माणसे, त्यांच्या भावना, श्रद्धांची, वृत्तीप्रवृत्तींची चिकित्सा करताना कवी एक शाश्वत प्रश्न उभा करतो.

*''प्रत्येक काळाच्या कोपऱ्यात असतात धर्म चिंब माणसे धरते कोणी सावली, वात्सल्याने पोटाशी या अवघ्यांना?''* (पृ. ३०)

ह्या प्रश्नाचं उत्तर काळाच्या उदरात दडलेलं असल्यानं तो सरपटणारा, धावणारा, झेपावणारा काळ सावजावर तुटून पडणारा बलाढ्य सिंह आहे. त्यांचे व्यवहारावर सणकून टीका करीत कवी भाष्य करतो.

*''पाद्यांनी... दायाद वाटेकऱ्यांनी नवाच आता घोळ केला सत्तेचा श्यामकर्ण मिळेल तसा तेवढाही वाटून घेतला''* (पृ. ३०)

तसेच निष्क्रीय शिक्केमारू आत्मतृप्त, अनुत्साही नागरिकांची स्थिती आणि त्यांचे लोकशाही विरोधी बेजबाबदार वर्तन याला कारणीभूत असल्याचे सांगून ''तेच तर वाहणार अखेरची श्रद्धांजली **'नाईलाजाने सगळ्यांना'** हे जळजळीत वास्तवही वर्णन करतो.

आपल्या सहचारिणी विषयी कवी भावनाशील होऊन त्या नाजूक नात्याची जपणूक करताना **'दिशांच्या पदराखाली'** या कवितेतून ''तुफानी उधळणारा बेलगाम कालअश्व, तुझ्या माझ्यात पेटवणार नाही ना दुराव्याचे अग्नीकुंड ?'' असा प्रश्न उपस्थित करतो. संध्याछायांनी भरकटणारं मन कवीला भावविवश करत आहे.

*''वाढतात सुरकुत्या... पिकतात केस... कमजोर तर नजरही होते नेहमीच्या दिवसात... पडझडीतही : तुझीच आठवण येते''* (पृ. ३२)

आयुष्यात जे ही साठवलं, गाठवलं ते सारं काही सोडून आलेला प्रियकर आपल्या नव्या सहचारासाठी आत चाललेली स्पंदनं, भावपूर्ण विचार व्यक्त करतो. नाव, गावाचे फाटके अस्तर, प्रतिष्ठेचा पोकळ डोलारा यांना कवी अजिबात महत्त्व देत नाही.'' आता तर कशाची खंत नाही. फक्त तुझी साथ हवी'' हीच असोशीची अपेक्षा व्यक्त करतो. कवीची आत्मनिष्ठा, आत्मप्रतीती आणि 'स्व' निर्मिती हा आत्मसंवाद बिनधास्त, मुक्त-स्वैर आहे. सहचारिणीकडून कवी साथ लाभावी म्हणून विचारतो ''ऐकतसे तू... की तू ही नाही ?''

आपल्या सभोवतालच्या राजकीय स्थितीगतीचा आलेख **'नवी दुकाने'** या कवितेतून कवी मांडतो. नेत्यांची नवी दुकाने, बेगडीवृत्ती, तडजोड, खोकी... पेट्यांची देवाण घेवाण, पत्रकारी जथे, पाकीट संस्कृती,

कव्हरस्टोरीचा भडक-बनावटपणा, सदा खोटे हसरे चेहरे, फोटो टिपणारे फोटोग्राफर या सर्वच वृत्तींवर कवी सटकून भाष्य करतो. सत्तालोलुप पुढारी फुले-आंबेडकरांच्या तत्त्वांचा गळा चिरतात, अनुयायी, गटांचे राजकारण, जात-धर्माचं राजकीय नेटवर्क, महामंडळाच्या सत्तापदांवर वर्णी लावण्याची वृत्ती या सर्वांवर टीका करत कवी एका मतदाराची कैफियत मांडतो. माणूस आर्थिक गुलामीमुळे, संसाराचा गाडा चालण्यासाठी डोळे बंद करतो आपोआप ! मग 'नवी दुकाने' स्थापन होतात.

*''मनातला कुबडा पाठीवर स्वार होतो... फटकारतोच चाबकाने आजन्माचे लायसन्स घेऊन वसतातच नवी नवी दुकाने''* (पृ. ३४)

**'अनिवास'** मधील कवितेचे सगळे रंगबेरंग, कवी-मनाचा कोंदलेला प्रवाह आणि प्रकटीकरणाची कवीची भावावस्था विशेष उल्लेखनीय आहेत. ही कविता आत्मनिष्ठेची असली तरी ती समष्टीपणाच्या सामाजिक बांधिलकीची आणि निखळ मानव्याच्या आंतरिक ओढीची कविता आहे.



**'अनिवास'** (कवितासंग्रह)
**कवी : केशव मेश्राम**
डिम्पल पब्लिकेशन,
वसई रोड स्टेशन (प. रेल्वे)
जि. ठाणे ४०१ २०२
मूल्य : ६० रु.

**डॉ. किसन पाटील**
'अक्षरवेल' ९/५४-२
शिवकॉलनी, जळगाव ४२५००२
पदव्युत्तर मराठी विभाग
मूळजी जेठा महाविद्यालय, जळगाव
दूरध्वनी (०२५७) २२८०४९५

पान क्र. ३३ वरून पुढे चालू...

आणि राजकीय चित्र स्पष्ट केले आहे. काही लेखिका परदेशात भारतीय मनाने रमलेल्या दिसून येतात. मायभूमीबद्दल प्रेम आहे, ओढ आहे. पण परत इकडे येण्याचा विचार नाही. भारतीय आणि पाश्चात्य जीवनपद्धतीची तुलना त्यांनी केली आहे तसेच पाश्चात्य जीवनशैली कशी अंगवळणी पडली आहे हेही मोकळेपणाने लिहिलेले आहे. काही लेखिकांनी तेथे शिक्षण घेतले, नोकऱ्या केल्या, सामाजिक कार्यात झोकून दिले आणि आपल्या कार्यकर्तृत्वाचा स्वतंत्र ठसा उमटविलेला आहे. अमेरिकेतील व्यक्तिस्वातंत्र्याची संकल्पना मुलांच्याकडून घरात आली. ती स्विकारताना भारतीय संस्कृतीच्या मुशीत तयार झालेल्या आपल्या मनाची अवस्था कशी 'तळ्यात-मळ्यात' झाली याचे सुरेख चित्रण या ललित लेखातून लेखिकांनी केलेले आहे. वर्षा पुराणिक यांनी लिहिले आहे की 'नुसत्या इमारती किंवा ऐतिहासिक स्थळे पाहून तो देश कळत नाही. त्या देशांच्या माणसांमध्ये राहिले, त्या देशाचे समाजजीवन अंगिकारले तर तो देश अधिक कळतो.' या विधानाचा आधार घेऊन परदेशातील लेखिकांच्या ललित लेखनाचे मूल्यमापन करावयाचे झाले तर असे म्हणता येईल की तो देश त्यांना अधिक चांगल्या प्रकारे कळलेला आहे. तिथल्या जीवनातले अनुभव प्रामाणिकपणाने लिहिलेले आहेत. ललित लेखन हे स्वानुभवावर आधारित असते. त्यातला 'मी' जितका अधिक तीव्रतेने व्यक्त होईल, तितके ते लेख सकस आणि दर्जेदार होते. सध्या जागतिकीकरणाचा रेटा प्रचंड आहे. जग खूपच जवळ येत चालले आहे. वाहतूक, व्यापार आणि संपर्क-माध्यमे यामुळे परदेश आता 'दूरचा' राहिलेला नाही. आजची स्त्री ही 'बाळ जातो दूरदेशा.' करत आसवे ढाळणारी नाही. पंख पसरून भरारी मारण्यासाठी त्यांच्या पंखात बळ निर्माण करणारी आहे. पूर्वी नवऱ्याचा हात धरून परदेशात जाणारी स्त्री आता स्वकर्तृत्वावर परदेशगमन करीत आहे. त्यामुळे भविष्यकाळात बदलत्या काळाचे, परिस्थितीचे, जाणिवांचे हे चित्रण त्यांच्या लेखनातूनही येईल असे निश्चितपणे सांगावेसे वाटते.



**डॉ. ज्योत्स्ना आफळे**
७६/१०, 'सुयोग', शांतीशिला सोसायटी,
लॉ कॉलेज रोड, पुणे - ४.
फोन : २५४२४११६

पुस्तक परिचय

# 'बालशारदा' आणि 'शतकातील बालकविता'

डॉ. मंदा खांडगे

'बालशारदा' ह्या दुर्मिळ पुस्तकाचे संपादक ज्येष्ठ कवी व शिक्षणतज्ज्ञ ग. ह. पाटील. त्यांच्या जन्मशताब्दी वर्षात या दुर्मिळ पुस्तकाची सहावी आवृत्ती प्रसिद्ध करण्यात आली. १९३० साली या संग्रहाची पहिली आवृत्ती निघाली. म्हणजे ७५ वर्षांपेक्षाही जास्त काळ लोटला. त्या काळाच्या संदर्भात या पुस्तकाचे महत्त्व असे की, त्यावेळी मुलांसाठी स्वतंत्र बालगीतसंग्रह हाताच्या बोटावर मोजण्याइतके निघाले होते. मुलांसाठी बालकविता एकत्र करून संग्रह काढावा ही संकल्पना रुजली नव्हती. अशा कालखंडात हा संग्रह निघाला. त्याचे स्वागत चांगले झाले; कारण आज आपल्याला आवडतात त्या आणि आपण पाठ्यपुस्तकातून अभ्यासल्या त्या कविता या संग्रहात पहिल्यांदा संकलित झाल्या. अल्प कालावधीत त्याच्या पाच आवृत्त्या निघाल्या.

या संग्रहाचे वैशिष्ट्य असे की ग. ह. पाटील यांनी या संग्रहाला लहानशी पण रसोद्ग्राही, अभ्यासपूर्ण अशी प्रस्तावना लिहिली आहे. कवितांना संदर्भ टीपा तसेच क्लिष्ट शब्दांचे अर्थही दिले आहेत. वयाच्या अवघ्या पंचविशीमध्ये त्यांनी केलेले हे संपादन अतिशय काटेकोरपणे आणि अभ्यासपूर्ण असे केले आहे.

फुलपाखरू (ग. ह. पाटील) बाहुली (दत्त) अआई (दत्त) माझा भाऊ (बालकवी) चला सुटी झाली (वा. गो. मायदेव) चिमणा वासुदेव (के. नारखेडे) पाखरांची शाळा (ग. ह. पाटील) फुलांची विनंती (कुसुमाग्रज) रानपाखरा (गोपीनाथ तळवलकर) साधुदास (बालशिवाजी) अशा अनेक नितांत सुंदर कविता पहिल्यांदाच या संग्रहातून मुलांपर्यंत पोहोचल्या. अशी ७० बालगीते या संग्रहात संकलित झाली आहेत.

बालांच्या कवितांचे विविध गट त्यांनी केले आहेत. या गटानुसार (१० गट) कविता बालशारदात आहेत. उदा. मुलांचे टोळ, प्राणी पशु पक्षीविषयक, अद्‌भूत कल्पना, वत्सलगीते, निसर्ग, राष्ट्रीय गीते आदी. या संग्रहातील ७ ते १४ वयोगटातील कविता या विविध गटात विभागल्या आहेत. पहिल्या आवृत्तीत ४३ कविता होत्या. दुसऱ्या आवृत्तीत भर घालून संख्या ७० झाली. मुलांचे मानसशास्त्र जाणणाऱ्या ग. ह. पाटील यांना वाटते 'कळीचे फूल झालेले पाहणे व लहान मुलांच्या मनाचा विकास झालेला पाहणे यासारखे सुंदर व मनोहर दृश्य नाही.' मुलांच्या मनोविकासासाठी अशा प्रकारच्या साहित्याची आवश्यकता आहे. हे त्यांनी हेरले होते. त्यामुळे ७५ वर्षे लोटली तरी 'बालशारदा'चे महत्त्व तितकेच आहे. एका दुर्मिळ व चांगल्या संग्रहाची ६वी आवृत्ती काढून साई प्रकाशनाने ह्या दुर्मिळ पुस्तकाची आवृत्ती उपलब्ध करून दिली आहे.

**शतकातील बालकविता -**

गेल्या शंभर वर्षात बालकविता विविध अंगाने फुलली आहे. कविता म्हणजे आनंदाचे देणे. मुलांना कविता आवडतात. सहज गुणगुणताना पाठ होतात. चांगली बालकविता, लय, गंध, स्पर्श आणि नाद या ऐंद्रिय संवेदना सचेत करणारी असते. मुलांना आवडणाऱ्या, त्यांचे भावविश्व उजळणाऱ्या, नादमय, सहजसोप्या भाषेत लिहिलेल्या विपुल कविता मुलांसाठी गेल्या शंभर वर्षात लिहिल्या गेल्या आहेत. 'शतकातील बालकविता' या पुस्तकात गेल्या शंभर वर्षातील उत्तमोत्तम बालकविता संकलित केल्या आहेत. या कवितेच्या सागरातून निवडक मोती वेचण्याचे काम डॉ. लीला दीक्षित यांनी अतिशय मेहनतीने केले आहे. त्यासाठी पऱ्यांचे जग, पशु पक्षी, प्राणीसृष्टी, ग्रामजीवन, ज्ञान-विज्ञान, सणवार, मुलांच्या भावभावना, कुटुंबातील विविध नाती, निसर्ग, खेळ, लोककला अशा विविध घटकातील बालकवितांची निवड या पुस्तकासाठी त्यांनी केली आहे.

गेल्या शंभर वर्षात मराठी सारस्वतात अनेक ज्येष्ठ बालगीतकारांनी मोलाची भर घातली. मुलांसाठी उत्तम

बालकविता त्यांनी लिहिल्या त्यात दत्त, रे. टिळक, बालकवी, ग. ह. पाटील, भा. रा. तांबे, केशवकुमार, कुसुमाग्रज, संजीवनी मराठे, शांता शेळके ही कवी मंडळी होऊन गेली. डॉ. वि. म. कुलकर्णी, सरिता पदकी, कल्याण इनामदार, वृंदा लिमये, पद्मिनी बिनीवाले, सुभाष वसेकर, नीलिमा गुंडी आदी कवी कवयित्री आजही मुलांसाठी उत्तमोत्तम कविता लिहीत आहेत. त्यांच्याही कविता या संग्रहात समाविष्ट आहेत. समकालीन आणखी कितीतरी बालगीतकार मुलांसाठी उत्तम बालकविता लिहीत आहेत. त्यांच्या कविता या संग्रहात समाविष्ट होऊ शकल्या नाहीत त्याबद्दल संपादकांना दोष देता येत नाही. पृष्ठांची मर्यादा आड येते. गेल्या पिढीतील ताराबाई मोडक, दत्त प्रसन्न कारखानीस, सरस्वती सुभेदार, ना. गो. शुक्ल ही नावे बालक्षेत्रात मोठी आहेत. त्यांना मात्र या संग्रहात स्थान द्यायला हवे होते असे वाटते. कारण कुठलेही संपादन हा त्या त्या साहित्यप्रकारचा एकप्रकारे इतिहास असतो. या संग्रहात या गेल्या पिढीतील महत्त्वाच्या बालकविता लिहिणाऱ्या कवींच्या कविता नाहीत. ही जाणीव वाटली. अर्थात संपादिकेने त्याबद्दल दिलगिरी व्यक्त केली आहे.

या संग्रहाला डॉ. लीला दीक्षित यांनी सर्वसमावेशक अशी तीस पानांची रसग्राही, अभ्यासपूर्ण प्रस्तावना लिहिली आहे. ती महत्त्वाची आहे. बालकवितेच्या अभ्यासकांना ती उपयुक्त आहे.

'मुलांची संवेदनक्षमता तीव्र असते. कुतूहल जागृत असते आणि जीवनोत्साह उदंड असतो. बालसाहित्यिकाला मुलांच्या मानसिकतेचे भान असावे लागते. एवढंच नाही, तर बालस्मृती ज्याला गंधित स्वरुपात जपता येतात तोच लेखक मुलांच्या या विश्वात प्रवेश करू शकतो.' असे अनुमान बालगीतकारांविषयी व उत्तम बालकवीते विषयी त्यांनी काढले आहे.

या विस्तृत प्रस्तावनेत त्यांनी मुलांची बालकविता कशी असावी या कवितेसाठी शिशु गट, बालगट, कुमार गट यांची विभागणी, वाणीरुप बालकविता, पाठ्यपुस्तकांचे जग, मालिकांचे जग, बालवाडी आणि बालकविता, असे बालकवितेशी संबंधित असलेल्या विविध विषयांसंबंधी सोदाहरण विवेचन दिले आहे. बालकवितेच्या आशय, अभिव्यक्तीचा विचार करताना मुलांसाठी भाषा कशी असावी, मुलांसाठी कविता कशी असावी, कवितांचे विषय कसे असावेत याविषयी सोदाहरण चर्चा केली आहे.

मुलांसाठी कोणत्या विषयावर कविता असाव्यात याविषयी डॉ. दीक्षित यांनी स्थूल आराखडा दिला आहे. पऱ्यांचे विश्व, निसर्ग, पशु पक्षी, विज्ञान, कुटुंबातील व्यक्ती, मुलांच्या भावभावना, हा आराखडा मनात कल्पून विषयांची विविधता राखण्याचा या संग्रहात प्रयत्न केला आहे या प्रत्येक गटाचे त्यांनी सोदाहरण विवेचन केले आहे.

बालकवितेच्या या शंभर वर्षांच्या प्रवासाचा मागोवा घेताना डॉ. लीला दीक्षित यांनी काही निरीक्षणे नोंदवली आहेत. ती महत्त्वाची आहेत. उदा. शैलीत होत जाणारा बदल, विज्ञान तंत्रज्ञानाचा वाढता प्रसार पण त्यामानाने कवितेत त्याचे उमटलेले अल्प प्रतिबिंब, बालकवितेत कथाकाव्याचा अभाव, बालकवितेचा समीक्षात्मक विचार कमी प्रमाणात, पर्यावरणाचे समग्र भान देणाऱ्या कविता अल्प प्रमाणात, वगैरे. शेवटच्या टप्प्यात त्यांनी बालकवितेचा व्यापक पटावर विचार मांडला आहे. चांगल्या बालकवितेला विश्वात्मक पातळीवर आस्वादमूल्याची शक्यता जास्त असते, असे त्या म्हणतात.

पुस्तकाची मांडणी, मुखपृष्ठ वेधक आहे. मुळात पुस्तक सचित्र आहे. संग्रहातील समाविष्ट कवींच्या जन्ममृत्यूच्या नोंदी बालसंग्रहांची नावे, मिळालेले पुरस्कार यांच्या नोंदी केलेला आहेत. सर्वच दृष्टीने संग्रह परिपूर्ण करण्यासाठी डॉ. लीला दीक्षित यांनी भरपूर कष्ट घेऊन एका अमोल ग्रंथाची भर मराठी सारस्वतात घातली आहे.

---

**'बालशारदा'**, संपादक : ग. ह. पाटील,
सहावी आवृत्ती : २००६, साई प्रकाशन, पुणे.
**शतकातील बालकविता** : संपादक : लीला दीक्षित
स्नेहल प्रकाशन, पुणे २००७

**डॉ. मंदा खांडगे**
२४, ऋणानुबंध,
'अमलताश' डी.पी. रोड,
औंध, पुणे ४११ ००७.

# आदिवासी कातकऱ्यांचे पारंपरिक नृत्य 'झिंगी'

डॉ. किरणकुमार कवठेकर

महाराष्ट्रातील सह्याद्री पर्वतरांगांच्या विस्तीर्ण प्रदेशात वास्तव्य करणाऱ्या काथोडी, कोकणा, कोकणी, कोळी महादेव, कोळी मल्हार, वारली, ठाकर, दुबळा, कोळी ढोर, डोंगर कोळी या आदिवासी जमातींप्रमाणे कातकरी जमातही वास्तव्य करताना आढळते. ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, नासिक, पुणे व सातारा या जिल्ह्यांमध्ये पारंपरिक पद्धतीने जीवन जगणारी ही जमात दुःख, दारिद्र्य व व्यथा-वेदनांच्या खाईत खितपत पडलेली दिसते. पण वारलंचे 'तारपा नृत्य' व मल्हारकोळींचे 'गौरी नृत्य' या नृत्यप्रकारांप्रमाणे कातकरींनी परेन-नृत्य, गौरी-नृत्य, ढोल-नृत्य व झिंगी नृत्य या नृत्यप्रकारांद्वारे आपली लोकनृत्यकला चांगल्या प्रकारे जतन केली आहे. आज कातकरींच्या परेन, गौरी व ढोल नृत्याविषयी अभ्यासकांना काहीएक प्रमाणात माहिती आहे, पण झिंगी नृत्याबद्दल मात्र आदिवासी साहित्य, समाज व संस्कृतीचे अभ्यासक अनभिज्ञ आहेत, असे म्हणणे मोठे धाडसाचे ठरेल. कारण त्यांच्या झिंगी नृत्याबद्दल कोठेही लिखित संदर्भ प्राप्त होत नाही; किंवा सदर नृत्यप्रकाराबद्दल कोठेही चर्चा झालेली आढळून येत नाही. एवढेच नव्हे तर आजच्या कातकरी समाजातील व इतर आदिवासी तरुणांना त्याबद्दल फारशी माहिती नाही असेही पहायला मिळते. त्यामुळे कातकरींचा झिंगी नृत्यप्रकार सर्वांना ज्ञात व्हावा व त्यावर अधिकाधिक चर्चा व्हावी या हेतूने सदर नृत्यप्रकाराचे स्वरूप व त्याची वैशिष्ट्ये मला उपलब्ध झालेल्या माहितीच्या आधारे आपणासमोर या शोधनिबंधाद्वारे अभिव्यक्त करण्याचा प्रयत्न करत आहे.

कातकरींच्या या नृत्यप्रकाराची जाणीव करून घेत असताना त्यांच्या सामाजिक व सांस्कृतिक जीवनसंदर्भाचाही काही प्रमाणात परिचय करून देणे आवश्यक वाटते. कारण त्याशिवाय झिंगी नृत्याचे महत्त्व लक्षात येणार नाही. त्यादृष्टीने त्यांच्या सामाजिक व सांस्कृतिक जीवनाचा वेध पुढीलप्रमाणे घेतला आहे.

**कातकरींचे सामाजिक व सांस्कृतिक जीवन**

इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांनी संपादित केलेल्या महिकावतीच्या बखरीत लिहिल्याप्रमाणे 'कातवडी व काथोडी' या नावाने ओळखले जाणारे कातकरी अतिप्राचीन लोक असून अंदाजे स्वयंभू शकपूर्व २००० च्या पूर्वीचे असावेत, असे म्हटले आहे. त्याकाळी ते कातड्याचे वस्त्र पांघरत असत म्हणून त्यांना महाराष्ट्रात कातवडी असे म्हटले असावे. तर पुढे उपजिविकेसाठी शिकार करण्याबरोबरच खैराच्या रसापासून कात बनविण्याच्या धंद्यावरून त्यांना कातकरी हे नाव पडले, अशीही नोंद सदर बखरीत आढळते. ही जमात अतिप्राचीन असूनही त्यांची लोकसंख्या १९८१ च्या जनगणनेनुसार केवळ १,७४,६०२ एवढीच आहे. या लोकसंख्येशी तुलना करता दिवसेंदिवस सदर लोकसंख्येत घट होताना आढळते. जगातील सर्वच जाती-जमातींची लोकसंख्या वाढत असताना कातकरींची लोकसंख्या मात्र घटत आहे ही मोठी चिंतेची बाब आहे. अशाच पद्धतीने ही लोकसंख्या घटत गेल्यास कातकरी जमात नजिकच्या काळात पूर्णपणे नामशेष होईल, असे जाणवते. ही प्राप्त परिस्थिती लक्षात घेऊन डॉ. गोविंद गारे म्हणतात, 'विशेष लक्षात घेण्यासारखी बाब म्हणजे कातकरी समाजाची लोकसंख्या प्रतिदशकात जेवढी वाढायला पाहिजे तेवढी वाढत नसून उलट ती घटत आहे, असे जनगणनेच्या आकडेवारीवरून दिसून आले आहे. देशात लोकसंख्या वाढ घटत असलेल्या ज्या पाच-दहा आदिम जमाती आहेत त्यामध्ये कातकरी समाज आहे. यावरून तुलनेने घटत चाललेली जमात असाच तिचा उल्लेख करावा लागेल. आदिवासींच्या इतिहासामध्ये असा एक दिवस उजाडेल की आदिम जमातीचे नामोनिशान शिल्लक रहाणार नाही.' कातकरी जमातीच्या या सद्य व भविष्यकालीन स्थितीसंबंधी डॉ. गोविंद गारे यांनी मांडलेले वरील विचार वास्तव आहेत.



अनुक्रमणिका

कारण भविष्याची चिंता न करता प्राप्त परिस्थितीचाच केवळ विचार करून पारंपरिक पद्धतीने जगणारा हा समाज अज्ञान व अंधश्रद्धेला बळी पडलेला आहे. व्यसनाधीनतेच्या आहारी गेलेला आहे. अनेक पुरुष तीन-चार स्त्रियांशी लग्न करतात. त्यामुळे घरात मुलांची संख्या अधिक तर उत्पन्न तुटपुंजे असल्याने भूक, उपासमार व दारिद्र्य हे त्यांचे स्थायीभाव बनले आहेत. उपजिविकेसाठी काही प्रमाणात भातशेती करण्याबरोबरच शिकार करणे, फळे-कंदमुळे गोळा करणे, लाकूड तोडणे, लाकडाच्या मोळ्या व कोळसा विकणे, विटभट्ट्यांवर व बांधकाम व्यावसायिकांकडे मजूर म्हणून अल्प मोबदल्यात काम करणे, असे त्यांचे दैनंदिन जीवन असून ते स्वतःच्या आरोग्याविषयीही फारच बेफिकीर आहेत. शैक्षणिक बाबतीत तर हा समाज फारच मागे आहे. त्यांचे साक्षरतेचे प्रमाण केवळ सात ते आठ टक्केच आहे. आज कातकरी जमातीत कातकरी, ढोर कातकरी व सोन कातकरी असे अंतर्गत स्तर आढळतात. हे सर्वच स्तर एकमेकांमध्ये सोयरिक न करता श्रेष्ठ-कनिष्ठत्वाच्या भावनेने जीवन जगतात. पण या सर्वच स्तरातील कातकरींनी आपला सामाजिक व सांस्कृतिक वारसा लोकनृत्य व लोकसाहित्याद्वारे आजवर चांगल्याप्रकारे जतन केला आहे. वर उल्लेखिलेल्या नृत्यप्रकारांप्रमाणे त्यांचे लोकसाहित्य लोकगीते, लोककथा, कथागीते, म्हणी, उखाणे व कोडी या विविध वाङ्मय प्रकारांनी समृद्ध आहे. ते भिल्लांच्या बोलीभाषेच्या प्रभावाने 'कंटोई बोली' बोलत असल्याने व त्या बोलीस लिपी नसल्याने त्यांचे सदर लोकसाहित्य मौखिक परंपरेवर टिकून आहे. त्यांच्यात प्रांतपरत्वे बोली भाषेत वेगळेपणा आढळत असून रायगड जिल्ह्यातील कातकरींना 'आखंवाली कातकरी' म्हणून ओळखले जाते.

**झिंगी नृत्याचे स्वरूप**

ठाणे जिल्ह्यात हे नृत्य झिंगी' किंवा 'झिंगीचिकी म्हणजे नृत्य करताना प्रारंभी पत्र्याचा डबा व ढोलकीच्या ठेक्यावर 'झिंगीचिकी' असा ताल धरला जातो. म्हणून त्यास झिंगीचा नाच असे म्हटले जाते. तर कातकरी समाजातील कार्यकर्ते रविंद्र भुरकुंडे असे सांगतात की, ''नृत्य करण्यापूर्वी नृत्यात सहभागी होणारे सर्वजण दारू पितात. दारू पिल्यानंतर जी झिंग येते त्या झिंगलेल्या अवस्थेत केला जाणारा नाच म्हणजे झिंगीचा नाच.'' सदू बाळू पवार यांच्या मते, ''नाचणारे कलाकार पाय मागेपुढे करत नाचताना जागेवरच जोराने गिरकी घेतात. म्हणून या नाचाला झिंगी असे म्हटले जाते.' अशी या नृत्यप्रकाराच्या नामाभिधानाविषयी विविध स्वरूपाची माहिती मिळते.

कातकरी समाजात हा नाच केव्हापासून केला जातो याबाबत निश्चित माहिती मिळत नाही. 'आमच्या पूर्वजांपासून हा नाच केला जातो' असे उत्तर प्राप्त होते. या नृत्यात जास्तीत जास्त वीस तर कमीतकमी सहा जण भाग घेतात. नृत्य करताना दोन गट केले जातात. प्रत्येक गटात स्त्री-पुरुषांची संख्या समान असते. गौरी-गणपती, दिवाळी व होळी इ. सणाला हा नाच आवर्जून केला जातो. अर्थात् नृत्य करणाऱ्यांच्या इच्छेनुसार केव्हाही केला जातो, त्यासाठी कोणत्याही स्वरूपाचे त्यांना बंधन नसते. नाचणारे पुरुष कमरेला मांगेली रूमाल बांधून अंगात आखूड बाह्यांचा शर्ट किंवा कब्जा घालतात. डोक्याला पटकासदृश्य कापड बांधतात. तर स्त्रिया कमरेला साडी गुंडाळून अंगात चोळी घालतात. दोन्ही गटातील मुख्य नाचणाऱ्यांच्या पायात घागऱ्या– म्हणजे घुंगरू बांधलेले असतात. टाकाऊ पत्र्याचा डबा व ढोलकीच्या तालावर नाचताना ते प्रथम गोलाकार फेर धरतात. हात एकमेकांच्या खांद्यावर ठेवून, तोंड ऐकवेळ आत व ऐकवेळ बाहेर करून नाचतात. बसून नाचणे, डोक्यावर नाचणे, पालथे झोपून म्हणजे पायाची बोटे व हाताचे पंजे जमिनीवर टेकून नाचणे, एकाच्या खांद्यावर दुसऱ्याला उभे करून नाचणे असेही विविध प्रकार या नृत्यात पाहायला मिळतात. (पालथे झोपून केला जाणारा हा कातकरींचा नृत्यप्रकार गोंड व कोलाम जमातीत केल्या जाणाऱ्या दंडार नृत्यातील 'उरूम कोला' या प्रकारातही आढळतो.) मुख्य गाणारा वाद्याच्या तालावर ज्याप्रकारचे नृत्य करेल त्याप्रमाणे इतरांनी गाणी गात नृत्य करायचे असते. या नृत्यात तमाशातील सवाल-जबाबांप्रमाणे दोन गावातील-पाड्यातील गटात नाचण्याची, गाण्याची व कोडी घालण्याची स्पर्धाही होते. जो गट नाचण्यात, गाणी

गाण्यात व कोड्यांचे उत्तर देण्यात मागे पडेल त्या गटातील सर्वांनी जिंकलेल्या गटातील नाचणाऱ्यांच्या पाया पडण्याची पद्धत आहे. त्याचबरोबर सवाल-जबाबप्रसंगी व नृत्य करताना ज्या पुरुषांना हार पत्करावी लागेल त्या पुरुषांनी आपली बायको किंवा बहीण प्रतिस्पर्धी गटातील पुरुषांना बक्षिस म्हणून देण्याची प्रथा आहे. नृत्यात सहभागी झालेल्या स्त्रीला जर हार पत्करावी लागली तर प्रतिस्पर्धी गटातील म्होरक्याची बायको म्हणून त्याच्यासोबत राहावे लागते. कातकरी समाजात आजही काही स्त्रिया या प्रकारचे जीवन जगताना आढळतात. अशा प्रकारच्या या स्पर्धांमुळे एकमेकांमध्ये वैमनस्य वाढीस लागून त्यांच्यात अनेकदा हाणामाऱ्या होतात, असेही पहायला मिळते. त्यामुळे सध्या हा नृत्यप्रकार फारच कमी प्रमाणात साजरा होतो.

**नृत्यप्रसंगी गायिली जाणारी गाणी**

तमाशात प्रारंभी गण-गौळण म्हणण्याची परंपरा आहे. त्याप्रमाणे या नृत्याची सुरूवातही गणगायनाने होते. कातकरी समाज नृत्यप्रसंगी गात असलेला गण पुढीलप्रमाणे–

*गण बसलं सभेला गातो रं – २*
*गण घोड्यावर बैसला रं – २*
*हा निंगून कैलासाला गेला रं – २*
*ह्या तल हाताचा केला थाला रं – २*
*ह्या पाची बोटाच्या केल्या जोती रं – २*
*चांद नि सुरया ओवालती रं – २*
*आज धन्तारी माझ्या मातेसरी – २*
*पाय ठेवला तुझ्या छातीवरी – २*

(दोन हा अंक प्रत्येक ओळ दोनवेळा म्हणण्याचा निर्देश करतो.)

(शब्दार्थ : निंगून – निघून, तल – तळ, थाला – थाळा, धन्तारी – धरती, मातेसरी – मातोश्री.)

अशा स्वरुपाच्या गणगायनातून ते आपला श्रद्धाभाव प्रकट करतात. तर मनोरंजनाच्या हेतूने–

*एक बाजू डोंगर अन एक बाजू डोंगरी मधी माना गाव -२*
*मस्तान मानी अन तूना बाजीराव – २*
*डाव्या हातावर गोंदवणं लेव माना नाव – २*
*मस्तान मानी अन तूना बाजीराव – २*
*मंग हाताल धरून फिरू सारा गाव – २*
*मस्तान मानी अन तूना बाजीराव – २*
*संसार करू मजेत एका ताटामंदी खावं – २*
*मस्तान मानी अन तूना बाजीराव – २*
*हाल करणार नाही आपून प्रेमानं ऱ्हावं – २*
*मस्तान मानी अन तूना बाजीराव – २*

(शब्दार्थ : माना – माझा, मान – माझं, तूना – तुझा, लेव – लिहिणे.)

अशा प्रकारची अनेक गाणी रात्रभर बेधुंद होवून गातात.

*'घाटावरनं उतरली गोपी*
*तीला चार कान नं एक टोपी.'*

हे कोडे असून त्याचे उत्तर 'लवंग' आहे. अशी अनेक कोडीही एकमेकांना घातली जातात त्यातून आपली कल्पकता दाखविणे व आनंद मिळविणे हा त्यांचा मुख्य हेतू असतो.

वरील प्रकारच्या गीतांशिवाय गौरी–गणपती, जीवदानी, राम-सीता, लक्ष्मण, कृष्ण-राधा, गौळणी अशा विषयांवर व स्वतःच्या दैनंदिन जीवनातील विविध अनुभवांवर आधारित अनेक गाणी गातात.

**नृत्यप्रसंगी वाजविली जाणारी वाद्ये :**

सदर नृत्य करताना टाकाऊ पत्र्याचा डबा किंवा पत्र्याची पाटी व ढोलकी इत्यादी वाद्यांचा उपयोग केला जातो. पत्र्याचा डबा किंवा पाटी बांबूच्या दोन पातळ काड्या घेऊन ताशा वाद्य वाजविल्याप्रमाणे वाजवितात. तर ढोलकी हे वाद्य ते स्वतः ताडाच्या खोडापासून बनवितात. ढोलकीसाठी शेळी, गाय किंवा बैलाचे कातडे वापरतात.

**नृत्याची वैशिष्ट्ये :**

कातकरी बांधव हे नृत्य जलद गतीने करतात. नृत्यात तरुणांपासून वयोवृद्धांपर्यंत कोणीही सहभागी होतात. नृत्य करताना म्हटली जाणारी गाणी चढ्या आवाजत गायिली जातात. नृत्यातील अधिकतर गाण्यांचा विषय प्रेमभाव हाच असतो. गाणी गाताना मात्र आपला श्रद्धाभाव प्रकट करण्यासाठी प्रारंभी गौरी-गणपती, जीवदानी, श्रीराम यांचे गुणगान गातात, तर मनोरंजनासाठी कृष्ण-राधा-गौळणी, बाजीराव-मस्तानी, स्त्री-पुरुषांमधील प्रेमसंबंध, एकमेकांच्या

आवडी-निवडी, रूसवा-फुगवा, आशा-आकांक्षा, कौटुंबिक स्थिती या सर्व विषयांवर ते सहजपणे रचना करतात. नृत्य करताना ते तमाशातील नाच्यांप्रमाणे व दरबारी कवींप्रमाणे हजरजबाबीपणा दाखवितात. त्यातून त्यांचे नृत्यातील कौशल्य व गीतरचनेतील कल्पकता पाहणाऱ्यांना-ऐकणाऱ्यांना मंत्रमुग्ध करते. त्यांना नृत्याबरोबरच गायनाचीही चांगली आवड असल्याने गीत रचनेशी ते एकरूप होऊन गातात. त्यामुळे ऐकणाऱ्यांवर एक वेगळाच प्रभाव पडतो. सदर नृत्यप्रसंगी वाजविली जाणारी वाद्ये मोजकीच असतात. पण ती वाजविणारे वादक मोठ्या कलात्मकतेने वाजवितात. नृत्य-गायनात अधिकाधिक रंगत आणण्याचा ते चांगला प्रयत्न करतात.

नृत्यप्रसंगी स्पर्धा होतात तेव्हा जो 'पण' लावला जातो किंवा बक्षीस म्हणून देण्याचा एकमेकांना जो शब्द (आश्वासन) दिला जातो तो ते काटेकोरपणे पाळतात. यातून त्यांच्या स्वभावविशेषाचीही जाणीव होते. अशा विविध वैशिष्ट्यांनी नटलेले त्यांचे नृत्य पहायला मिळते.

**निष्कर्ष :**

आदिवासी कातकरींचे हे नृत्य वरील अनेक स्वरूप व वैशिष्ट्यांनी ओतःप्रोत भरलेले असून हा नाच काळाच्या ओघात बंद पडू नये म्हणून सर्वच पातळ्यांवर प्रयत्न करणे आवश्यक आहे. नृत्य करताना दारू पिणे, महाभारतातील द्रौपदीप्रमाणे स्त्रीला बक्षीसांच्या माध्यमातून दुय्यम लेखणे असे काही दोष या नृत्यातून निदर्शनास येतात त्यासाठी त्यांच्याशी जवळीक साधणे, त्यांचे प्रबोधन करणे व स्वतःच्या समाज व संस्कृतीच्या दृष्टीने त्यांच्यात या नृत्यप्रकाराच्या वेगळेपणाची व आवश्यकतेची जाणीव निर्माण करणे ही आज काळाची गरज आहे. अन्यथा आपला देश काळाच्या ओघात एका चांगल्या नृत्यप्रकाराला– समाजाला पारखा होईल, असे येथे नमूद करावे असे वाटते.

**संदर्भग्रंथ :**


१) इतिहासाचार्य वि. का. राजवाडे समग्र साहित्य. खंड बारावा, संपादक राजवाडे, संपादन डॉ. मु. ब. शहा.

२) आदिवासी समस्या आणि बदलते संदर्भ – डॉ. गोविंद गारे.

३) महाराष्ट्रातील अनुसूचित क्षेत्र आणि अनुसूचित (आदिवासी) जमाती (सामाजिक व सांस्कृतिक मागोवा) – डॉ. गोविंद गारे.

४) मराठी विश्वकोश – खंड ३, संपादक - तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी.


❖❖❖

**व्यक्तीसंदर्भ :**

१) भुरकुंडे, रवींद्र नागो.

२) पवार, सदू बाळू

३) वाघ, दीपक विक्रम

मु. पो. सापने बु., ता. वाडा, जि. ठाणे.


**प्रा. डॉ. किरणकुमार कवठेकर**
'सुमेध' एकतानगर, ऐनशेत रोड, वाडा,
मु.पो.ता. वाडा, जि. ठाणे - ४२१३०३.







अनुक्रमणिका

# मंगेश पाडगावकरांची 'दर्शन'

एक प्रतिक्रिया

**प्रा. एम्. पी. पाटील**

एखाद्या चिद्‌विलासवादी थोर तत्त्वज्ञाच्या काव्याला बृहत्‌ग्रंथाच्या सिंधूतील निदान बिंदूवत् प्रत्यय देणारी एखादी स्फुट कविताही असू शकते.

त्या थोर तत्त्वचिंतकाच्या चिद्‌विलासवादाचे मूळ ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलाच्या अकराव्या अनुवाकातील नासदीय सूत्रापर्यंत गेलेले असते. त्याचे पडसाद उपनिषदे, काश्मिरी शैवांचे अद्वयानंद शांकरदर्शन, गीतेतील विश्वरूपदर्शन आदींमध्ये पडलेले असतात. 'एकेवाद्वितीयं ब्रह्म', 'सोऽकायमयत। बहुस्याम्।' 'सर्वं खलु इदं ब्रह्म' आदी अवतरणांत या आकारित विश्वातील ब्रह्मरूपाबद्दलचे चिंतन केलेले आढळते. मग एखादा सर्जनशील प्रतिभेचा तो तत्त्वज्ञ कवी, आपल्या बृहद्‌ग्रंथात 'तैसे विश्व एणे नावे। हे मींचि पै आघवे। आता चंद्रबिंब सोलावे। न लगे जेवि॥' म्हणजे चंद्रबिंबातच चंद्र असतो या चपखल दृष्टांतून या आकारित विश्वातच ब्रह्म असते हे सूत्र मांडून जातो. पुढे 'म्हणोनि जग परौते। सारूनि पाहिजे माते। तैसा न्हवे उखिते। अवघे चि मी॥' हे प्रतिपादन ओघानेच येते. या विश्वापलिकडे जाऊन माझा शोध घ्यावा असा मी म्हणजे ब्रह्म नाहीच; या विश्वात जे काही आहे ते म्हणजेच ब्रह्म असे हे विश्वब्रह्माच्या एकरूपतेचे प्रतिपादन आहे.

या तत्त्वज्ञ कवीने या विश्वालाच ब्रह्म मानल्यामुळे या विश्वपसाऱ्यातील प्रतिमांनी रसरसलेले काव्यात्म सर्जन, त्याच्या शब्दाशब्दांतून अवतरत असते. शारदियेच्या चंद्रकळे- माझारीचे अमृतकण वेचणारी चकोरतलगे, आकाशीच्या चंद्राच्या दर्शन-आलिंगनाने फुलोरून जाणारी कमुदिनी, कमळ पाकळ्यांना स्पर्श न करता पराग वेचणारे भ्रमर, घनगर्जिता सरसा नृत्य करणारा मयूर कुंकुमे न्हालेली नागपिले, वाऱ्यावर डुलणारी कमलदळे, नितुळकंद पाण्याचे वाहाणारे झरे, मलयनिलु मंद सुगंध, महोदधीचे तरंग- असे हे विश्वचैतन्याने भारलेले नितांतसुंदर काव्यात्म सर्जन असते.

आपल्या अवतीभवतीच्या एखाद्या कवीची एखादी स्फुट कविता वाचताना, त्या बृहद्‌ग्रंथातील तात्त्विक/काव्यात्म दर्शनाचे स्फुट-अस्फुट पडसाद आपल्या मनात उमटत असतात, एवढे तरी मर्यादित श्रेय त्या कवितेला दिले गेले पाहिजे, याची नोंद व्हावी, एवढ्यापुरताच उपरोक्त संदर्भ काहीसा विस्ताराने दिला गेला आहे.

मंगेश पाडगावकर नावाच्या आजच्या प्रसिद्ध कवीने ५० वर्षांपूर्वीच्या त्या विशीबावीसीच्या कोवळ्या वयात, आठदहा दिवसांच्या अवधीत, अशा तत्त्वदर्शनाच्या एकच नव्हे तर एकदम तीन कविता लिहिल्या आहेत. उत्कट प्रेमभाव जगण्याच्या वयात, तेवढ्याच उत्कटतेने हे विश्वाच्या आकलनाचे प्रातिभ चिंतन... ब्रह्म/विश्व या द्वंद्वाबद्दल चिंतन करणारे साक्षात्कारी साधक, तत्त्वचिंतक दर्शनकार, व्यासंगी प्रज्ञावंत, तत्त्वज्ञ प्रतिभावंत आदी पूर्वसूरींचा हा संस्कार असतो की त्याचबरोबर सामूहिक अबोध मनाच्या संवेदनशील प्रवाहातून झिरपत झिरपत येत असलेले हे ब्रह्मचिंतन एखाद्याच्या आनुभाविक कविप्रतिभेतून व्यक्त होत असते ?...

'ब्रह्म सत्यं; जगत् मिथ्या' या मायावादी तथ्याशी या तीनही कवितात वाद घातला आहे. 'जय जय हे पार्थिवते' ते प्रारंभ केला आहे; आणि 'आज जागे आहे मन' या कवितेने समारोप केला आहे. 'कळलें आतां नाहिं तुझ्याविण ब्रह्म वेगळे' असे पार्थिवतेच्या संदर्भात, त्या कवितेत सूतोवाच केले आहे; याच 'अणूंत अणूंत, परमाणूं'त असलेल्या 'ब्रह्मा'चे आकलन होण्यासाठी 'जागें हवे माझें मन' अशी जाण दिली आहे. आणि 'दर्शन' ही मध्यवर्ती कविता, 'ब्रह्म-विश्व' या द्वंद्वातून परिपूर्ण मुक्त होत, 'या विश्वापलीकडे ब्रह्म नाहीच' या ठाम निश्चित निर्णयताप्रत येत असल्याचे दिसते.

'दर्शन' कवितेची 'रे/अरे' ची एकेरी संबोधन शैली नामा-तुक्याच्या अभंगवाणीची आहे; पण वेगळ्या वाटेकडे नेणारी आहे. नामा-तुक्याच्या अभंगवाणीत त्यांना अभिप्रेत असलेल्या विश्वापलीकडील ब्रह्माच्या दर्शनासाठीची आळवणी आहे; आणि प्रस्तुत कवीची वाणी त्या ब्रह्माचे दर्शन नाकारणारी आहे.

'मी कधींच नाहीं म्हटलें की तू दे मजदर्शन', हा धृपदातील त्या दर्शनाला दिलेला 'चार्वाकी' नास्तिकतेचा नकार, कवितेच्या पाचही कडव्यांशेवटल्या पंक्तीतून मंत्रघोषवत् आवर्तित होत, त्या नसलेल्या ब्रह्माचे अस्तित्त्व ठामपणे नाकारीत आहे. कारण कवीच्या दृष्टीने अवतीभवतीचे विश्व एवढेच सत्य आहे. 'ब्रह्म' याच परिभाषेत म्हणावयाचे झाले तर 'डोळे भरुनि बघतों आहे सारे अनुदिन' तेच आणि तेवढेच ब्रह्म आहे. आणि हेच जर विश्वाबद्दलचे आकलन असेल तर 'रे कसें वेगळें म्हणूं सांग तुज यांच्यापासुन ?'... रे कसें शोधुं तुज वेड्यापरि मी तुलाच टाकुन ?' असा त्याचा युक्तिवाद बिनतोड आहे.

या कवितेत हा युक्तिवाद आनुभाविक आधारित उद्गामी (Inductive) अनुमानाच्या तार्किक पद्धतीने मांडला गेला आहे. मात्र हे उद्गामी अनुमान काव्यप्रतिभास्पर्शित असल्याने त्याला वैयक्तिक अनुभवाचे भावरूप प्राप्त झाले आहे.

विश्वाचे सौंदर्य भोगता भोगता, त्याचे गूढ शोधताना, निर्णायक निर्णयाप्रत येण्यापूर्वी कवीची वृत्ती काहीशी संभ्रमित होत असते. कधी त्याला हा विश्वपसारा म्हणजे त्या चिद्ब्रह्माचे विलसन वाटत असते, तर कधी हे विश्व ब्रह्मरूपच वाटत असे. पण शेवटी या विश्वाच्या पलीकडे ते तथाकथित ब्रह्म नसल्याच्या जाणीवेने, त्या ब्रह्माचा, विश्वाला टोकून शोध घेणे हे वेडेपणाचे ठरेल या तर्कअधिष्ठित भावात्म निर्णयाप्रत तो येत असतो.

या कवितेतील उपरोक्त मध्यवर्ती तथ्य लक्षात घेतल्यानंतर, तिचा आशय संक्षेपाने देणे पुरेसे ठरावे. त्याचा आरंभ दुसऱ्या कडव्यापासून करणे संयुक्तिक ठरेल.

दुसऱ्या कडव्यात 'तूं रंगच व्हावें... तूं ढग होऊन झुलावें... धारांतुन तुझे कृपामय हात दिसावे... किरणांच्या अधरांवर स्मित तव फुलत असावें' हे सारे जे कवी 'डोळे भरूनी बघतों आहें सारें अनुदिन' ते कवीला 'ब्रह्म'चे विलसन वाटत असते. पण पहिल्या, तिसऱ्या आणि चौथ्या कडव्यांमध्ये अनादी भूतकाळापासून आजच्या वर्तमानापर्यंत विश्व म्हणजे 'ब्रह्म'चे केवळ विलसन नसून, विश्व हे ब्रह्मच आहे असे कवीचे आनुभाविक अनुमान व्यक्त होत असते.— विश्व आणि ब्रह्म या द्वंद्वाबद्दल बोलणारे या भूतलावर कुणीही नव्हते, त्या अनादी काळातही, 'होत्या लाटा उधळित अपुली फेनिल कविता... फुलाफुलांतुन अखंड उमलत होती नवता... होते वारे वाहत, तारे होते चमकत... बाभळिवरही गुच्छ फुलांचे होते लगडत' या साऱ्या विश्व सौंदर्यमय सत्याला ब्रह्मापासून वेगळे असे कसे म्हणता येईल असा त्याचा प्रश्न आहे. या प्रश्नातून विश्व हे ब्रह्मच आहे हे सत्य सांगितले जात आहे. तिसऱ्या आणि चौथ्या कडव्यात वसंतातुन फुलणारा, दंवबिंदूत झगमगणारा, बीजांतून फुलणारा, रंगांतून खुलणारा आणि अवतीभवतीच्या मानवी जनसागराच्या मनामनांतून, कर्माकर्मांतून, सुखांतून-दुःखांतून दिसणारी ही सारी रूपे म्हणजे तुझ्याच चेतनेची, तुझ्याच प्रेरणेची-तुझीच रूपे असतात, असे ब्रह्म-विश्वाच्या एकरूपतेचे प्रतिपादन असते.

शेवटच्या पाचव्या निर्णायक कडव्यात, चारही कडव्यातील विश्वात्मक ब्रह्माचे एकत्रीकरण करून 'ऋतूऋतूंतुन, फळाफळांतुन, त्या गगनांतुन, या मातींतुन, स्थितीगतींतुन, संघर्षांतुन, सुखदुःखांतुन, व्यथेव्यथेंतुन, या सृष्टींतुन, अन् भवतींच्या मानवतेंतुन जर फक्त तूच (फक्त तेवढंच ब्रह्म) असतोस, तर तुलाच टाकून (या विश्वाला टाकून) त्या नसलेल्या ब्रह्माचा शोध कशाला करू असा प्रश्न उपस्थित करून या आकारित विश्वापलीकडे वेगळे ब्रह्म नसते, हे आनुभाविक सत्य स्पष्टपणे सुचविले जाते.

***

हा सौंदर्यजीवी कवी आहे. तो आनंदयात्री आहे. सौंदर्यदर्शनाने वेडावून जाणारा कवी आहे. पंचसंवेदनांच्या सर्वांगांनी ते सौंदर्य भोगणारा कवी आहे. हा सौंदर्यभोग घेता घेता, त्याचे गूढ शोधणारा हा कवी

आहे. त्याला या सुंदर जीवनाबद्दलचे कुतुहल आहे. त्याचे हे कुतुहल, त्यामधून येणारे चिंतन आणि त्याची सौंदर्यमग्नता या साऱ्यातून 'जे नकळत कळते... जे गूढ उकलते' ते तथाकथित पारलौकिक/अलौकिक ब्रह्माची 'मिथ्यता' सांगणारे-व्यर्थता सांगणारे असते. म्हणून त्या मिथ्या ब्रह्माचा शोध घेणे, त्याच्या दर्शनाचा ध्यास घेणे हे व्यर्थच आहे. हे त्याचे भावनिक आणि तार्किक निर्णयन आहे. तेच या कवितेचे प्रातिभ अर्थ सौंदर्य आहे.

या सौंदर्यपूजक कवीच्या या कवितेत येणाऱ्या साऱ्या निसर्गसौंदर्याच्या प्रतिमा, असार मायेच्या मिथ्या कल्पनेला छेद देणाऱ्या आहेत. हा विश्वपसारा त्याचा संसार हा असार-निरर्थक नसून, हे सारेच सौंदर्यमय, आनंदमय, चैतन्यमय आहे अशा जाणीवेने जीवनाकडे ओढून नेणाऱ्या ह्या प्रतिमा आहेत विश्वाच्या आनंदकंद सौंदर्याचा भरभरून प्रत्यय देणाऱ्या ह्या प्रतिमा आहेत. एक प्रकारच्या उदात्तस्पर्शित प्रसन्नतेच्या गाभाऱ्यात नेणाऱ्या ह्या प्रतिमा आहेत.

या प्रतिमांचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे विशीबावीशीतील तारुण्याच्या उत्कट फेसाळत्या भाववृत्तींचे तद्सदृश निसर्गसौंदर्यात स्थलांतरीत होणाऱ्या या प्रतिमा आहेत. किंबहुना त्या सौंदर्य रंगगंधात उत्कटलेल्या तद्सदृश्य भाववृत्तीच त्या प्रतिमांतून व्यक्त होत असतात. 'फेनिल कविता उधळणाऱ्या लाटा, फुलाफुलांतुन उमलणारी नवता', यात ते भावस्थलांतर होत असते. 'होते वारे वाहत, तारे होते चमकत, बाभळिवरही गुच्छ फुलांचे होते लगडत' यातही होत असते. 'रंग, वसंत, झगमगणारे दवबिंदू' यांतूनही तेच; आणि शेवटल्या 'ऋतूऋतूंतुन, फुलाफळांतुन, त्या गगनांतुन, या मातींतुन या आणि अशा साऱ्या आवेगी संवादी नादावर्तनातून कविसापेक्ष सदृश उत्कट भावतरंगांचे रंगगंध उधळत येत असतात.

आणि या निसर्गातील चैतन्याला जो एक हालणारा, डुलणारा, फुलणारा, झुलणारा लय आहे तोच लय या कवितेच्या शब्दाशब्दांतून आंदोलत असतो. लाटालाटांचा, वाहत्या वाऱ्याचा, झुलत्या फुलांचा, उडत्या पाखरांचा, पृथ्वीच्या गतीचा, पावसाच्या सरींचा दिवसरातीचा, ऋतुचक्राचा तो आदिम लय, येथील ऋतूऋतूंतुन, फुलाफळांतुन, गगनांतुन, मातींतुन, स्थितींतुन, गतीतुन, सुखातुन, दुःखातुन, या सृष्टींतुन, मानवतेंतुन या साऱ्या शब्दांतून कवितेतील आशयाशी संवाद साधत, आपल्याच लयदारीत बोलत असतो.

या आंतरिक लयाला मुक्तछंदीय आविष्कारातील मुक्तपणाची स्वैरता न देता, त्याला निसर्गाच्या लयस्पंदनांशी आणखी एकरूप होण्यासाठी सुरेल गेयतेच्या सममात्रांच्या समांतीरत आवर्तनात गुंफले आहे. २८ मात्रांच्या धृपदानंतर २४ मात्रांच्या ४ पंक्तींचा एकमेकीशी समांतरा साधणारा अंतरा आणि परत २८ मात्रांच्या पाचव्या विरोधी लयाच्या समेकडे येणाऱ्या पंक्तीने धृपदाशी समांतरता साधली जाते. अशा पाच कडव्यांतून आवर्तित होणारी बंदिस्त बंदीश या कवितेला सुरेल लयसौंदर्य बहाल करीत असते.

या सुरेल लयसौंदर्यात मात्रावृत्ताच्या धर्मानुसार येणारे यमक-प्रास आणि त्यांच्याबरोबर येणारी नादमधुरता (जिचे निनादन वरील प्रतिक्रियांत आपण अनुभवले आहे.) कवितेच्या सौंदर्यात अधिकाधिक भर घालीत असते.

*दर्शन*

*मी कधीच नाही म्हटलें की तूं दे मज दर्शन*
*होत्या लाटा उधळित अपुली फेनिल कविता*
*फुलाफुलांतुन अखंड उमलत होती नवता*
*होते वारे वाहत, तारे होते चमकत*
*बाभळिवरही गुच्छ फुलांचे होते लगडत*
*रे कसें वेगळें म्हणूं सांग तुज यांच्यापासुन ?*
*मीं कधींच नाहीं म्हटलें कीं तूं दे मज दर्शन*
*उठुनि पहाटे जावें तर तूं रंगच व्हवें*
*नभीं पहावें तर तूं ढग होऊन झुलावें*
*या धारांतुन तुझे कृपामय हात दिसावे*
*किरणांच्या अधरांवर स्मित तव फुलत असावें*
*हें डोळे भरुनी बघतों आहें सारें अनुदिन*
*मीं कधींच नाहीं म्हटलें कीं तूं दे मज दर्शन*
तूं नाहिंस ? या वसंतांतुनी कोण फुले मग ?
तूं नाहिंस ? दवबिंदुंत कां मग झगमग झगमग ?

(पान क्र. ४९ वर पहा

# आंबेडकरी जलसे

## मोतीराम कटारे

'आंबेडकरी जलसे' हा डॉ. भगवान ठाकूर यांचा ग्रंथ सुगावा प्रकाशन, पुणे यांनी २००५ मध्ये प्रकाशित केलेला आहे. आजवर शाहिरी वा जलसे यावर सुटे लेखन वा व्यक्तीनिष्ठ ग्रंथही प्रसिद्ध झाले असले तरी महाराष्ट्रातील समग्र जलशांची आणि जलसेकारांची माहिती देणारा ग्रंथ आजवर उपलब्ध नव्हता. भगवान ठाकूर यांनी हा ग्रंथ सिद्ध करून आंबेडकरी चळवळीच्या एका उपांगाला उशिराने का होईना न्याय देण्याचा प्रयत्न केला आहे,

आंबेडकरी चळवळीतले लेखक-कलावंत त्या त्या काळात चळवळीच्या दृष्टीने घडणाऱ्या महत्त्वाच्या घटनांची नोंद करीत नाहीत. परिणामी इतिहासाची साधने तयार होत नाहीत. इतिहासाची साधने उपलब्ध नसतील तर विकृत इतिहास लिहिला जाण्याची भीती असते. या ग्रंथात लेखकाने कुठेही इतिहास विकृत होऊ न देता आपले लेखन केले आहे. जर विषयाच्या अनुषंगाने तसे लेखन केले गेले असेल तर तो प्रयत्न त्यांनी हाणून पाडलेला आहे. नव्हे तर तो विकृत इतिहास पुसून पुनर्लेखनाद्वारे इतिहासाला पुन्हा आपल्या पायावर उभे केले आहे. त्यासाठी ते संयत विद्रोहाचाही वापर आपल्या लेखनात करतात.

आंबेडकरी जलसा या विषयावर यापूर्वी लेखन करणारांत डॉ. गंगाधर पानतावणे, डॉ. कृष्णा किरवले ही नावे महत्त्वाची आहेत. डॉ. गंगाधर पानतावणे यांनी आंबेडकरी जलशांचे आद्यत्व किसन भागोजी बनसोड यांना देऊन भिमराव कर्डक यांच्यावर अन्याय करण्याचा प्रयत्न केला असल्याचे लेखक आपल्या निदर्शनास आणून देतो. किसन भागूजी बनसोड यांना सत्यशोधक चळवळीची पार्श्वभूमी आहे; हे सर्वश्रुत आहे. सत्यशोधक विचारांचा प्रचार आणि प्रसार करण्यासाठी त्यांनी आपली लेखणी झिजवली; हेही सर्वज्ञात आहे. ही वस्तुस्थिती नाकारणे म्हणजे इतिहासाचा विपर्यास करण्यासारखे आहे. आंबेडकरी जलसे हे आंबेडकरी विचारधारेतून जन्माला आले असतील तर सत्यशोधक किसन भागोजी बनसोड हे आद्य जलसाकार कसे ठरू शकतात हा लेखकाचा प्रश्न इथे महत्त्वाचा ठरतो. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी फुल्यांना गुरुस्थानी स्वीकारले असेल तर सत्यशोधक चळवळ आणि आंबेडकरी चळवळ यात अंतर उरत नाही. हे अंतर आपण बुजवले तरी आद्यत्वाचे दोन जलसाकारातले अंतर काही बुजत नाही. सत्यशोधकातला पहिला जलसाकार भीमराव महामुनी आहेत. ह्यामुळे किसन भागोजी बनसोड इथेही मागे पडतात. इथे मुद्दा उरतो तो जातीचा. ते तत्कालीन महार जातीचे असले तरी त्यांनी काम केले फक्त सत्यशोधक चळवळीसाठी. त्यांचे प्रेरणास्थान होते क्रांतिबा फुले ! अशा परिस्थितीत आंबेडकरी जलशांचे आद्यत्व जाते भीमराव करडकांकडे ! डॉ. पानतावणे यांनी केलेला हा इतिहासाचा विपर्यास लेखकाने नेमकेपणाने खोडून काढला आहे. लेखकाचा या संदर्भातील युक्तीवाद मुळातून वाचण्यासारखा आहे.

आंबेडकरी विचार वैश्विक आहे असे आपण मानतो पण आपल्या कृतीतून तसे दिसत नाही. आंबेडकरी चळवळीतले लेखकही याला अपवाद नाहीत. ते सतत जात, पोटजात, प्रांतभेद यात अडकून पडल्याचे दिसते. किसन भागोजी बनसोड हे विदर्भातील असल्याने जलसाकाराचा आद्यत्वाचा मान यानिमित्ताने विदर्भाकडे नेण्याचा डॉ. गंगाधर पानतावणे यांचा प्रयत्न असावा काय ? त्याचे उत्तर त्यांच्या निष्कर्षातूनच मिळाले आहे. संशोधक एखादा निष्कर्ष काढताना त्यावर सर्वांगिण विचार करीत असतो व शक्यतो आपला निष्कर्ष खोडला जाणार नाही याची काळजी घेतो. डॉ. गंगाधर पानतावणे यांनी अंतिम निष्कर्षाप्रत पोहचण्याआधी ही काळजी घेतलेली दिसत नाही. याचा अर्थ मागची पिढी संशोधनाबाबत गंभीर नव्हती असेही विधान करता येते. उदाहरणच द्यायचे झाल्यास डॉ. यशवंत मनोहर यांचे देता येईल. त्यांनी आपल्या 'आंबेडकरी साहित्य आणि





अनुक्रमणिका

चळवळ' या ग्रंथात हि. ल. कोसारे यांचा हवाला देऊन १९३५ मध्ये 'आंबेडकर साहित्य समाज' तर १९४१ मध्ये 'साहित्य चर्चा मंडळ' नागपुरात स्थापन झाल्याचे नोंदवले आहे व त्यावर पुण्या मुंबईच्या आधी विदर्भात साहित्य संस्था स्थापन झाल्याचा निष्कर्ष काढला आहे. 'दलित साहित्य : चर्चा आणि चिंतन' या ग्रंथात डॉ. गंगाधर पानतावणे यांनी 'साहित्य चर्चा मंडळांची स्थापना वर्षे ही ही १९३९ व १९५५ नोंदवली आहे. मात्र त्यांनी निष्कर्ष काढलेला नाही. १९५० साली मुंबईत स्थापन झालेल्या 'दलित साहित्य सेवक संघां'चे आद्यत्व विदर्भात नेण्यासाठी धडपड करताना किमान तर्काचा आधार तरी त्यांनी घ्यायला हवा होता. ना. रा. शेंडे या मंडळातील एक प्रमुख घटक होते. त्यांची कारकीर्द लक्षात घेता हे वर्ष १९५५ अधिक असण्याची शक्यता अधिक आहे. 'आंबेडकर साहित्य समाज' संदर्भातही असेच म्हणता येते हा समाज आंबेडकरांनी लिहिलेल्या साहित्याचा अभ्यास करणारांसाठी निर्माण केला असण्याची शक्यता अधिक आहे. मुद्दा एवढाच की विदर्भातील लेखक-विचारवंतांना आद्यत्व घेण्याची घाई आहे. त्यातूनच डॉ. पानतावणे यांनी हा निष्कर्ष काढला असावा व आद्य जलसाकार भीमराव करंडक यांच्यावर अन्याय केला असावा.



जलसा कलावंताचे दलित साहित्य चळवळीतील व दलित रंगभूमी चळवळीतील योगदान निश्चित करावे व त्यांचा परिचय करून द्यावा हा या ग्रंथाचा हेतू असल्याचे लेखकाने नोंदवले आहे व तो हेतू त्यांनी पूर्णत्वाला नेला आहे. समग्र महाराष्ट्रातील जलसा कलावंताची खडा न खडा माहिती एकत्रितपणे या ग्रंथात अभ्यासायला मिळते. जलसांमधून सादर केलेले फार्स, पारंपारिक तमाशा, सत्यशोधक जलसा व आंबेडकरी जलसा यातला नेमका फरकही लेखकाने अधोरेखित केला आहे. जलसांच्या विकासक्रमानुसार ह्यांच्या वाद्यात झालेले बदलही लेखकाने नोंदवले आहेत. महत्त्वाच्या जलसाकारांचे चरित्र ते वाचकांना ज्ञात करून देतात. जलसा या कलाप्रकाराचा समग्र परिचय करून देणारा आंबेडकरी साहित्य चळवळीतला हा पहिला ग्रंथ ठरला आहे.

या कालखंडात झालेल्या सर्वच जलसाकारांनी हरिजन या शब्दाला विरोध केलेला आहे. आज साहित्यात दलित हा शब्द लोकप्रिय आहे. दलित ही संकल्पना हरिजन या संकल्पनेला पर्याय म्हणून पुढे आलेली आहे. धम्मचक्र प्रवर्तनाला पन्नास वर्षे पूर्ण होत असताना दलित संकल्पनेचा वापर म्हणजे आंबेडकरी विचारांना म्हणण्यापेक्षा बाबासाहेबांच्या धम्मविचाराला नकार आहे. आंबेडकरी जलसे हा ग्रंथ म्हणजे दलित साहित्य संकल्पनेकडून बोधी साहित्य संकल्पनेकडे केलेला प्रवास आहे. म्हणूनच लेखकाला जलशाची बीजे अश्वघोषाच्या नाट्यशास्त्रात सापडतात. अश्वघोषाचे स्वतंत्र नाट्यशास्त्र आहे की नाही याबाबत मतभेद असू शकतात मात्र अश्वघोषाने शारीपुत्र-प्रकरण, राष्ट्रपाल, उर्वशी-वियोग, रूपकावशेष-एक व रूपकावशेष-दोन ही पाच नाटके लिहिली आहेत. अश्वघोषाने आपल्या सर्वच

कलाकृतीमधून बुद्धविचार ठामपणे मांडला. जलसाकारांनीही अश्वघोषाप्रमाणे आंबेडकरी विचारांची ठामपणे मांडणी केली असल्याचे दिसते.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या वैचारिक विकासातील परिवर्तनाचे सारे बदल जलसाकारांनी टिपले आहेत. बाबासाहेबांचा धम्मविचार तर त्यांनी अत्यंत साध्या-सोप्या भाषेत लोकांना समजावून सांगितला. दलित संज्ञा स्वीकारणाऱ्यांनी धम्मचळवळीकडे अत्यंत दुर्लक्ष केलेले आहे. बुद्धाचे नाव घ्यायलाही साहित्यिक कचरतात. दलित साहित्याची चळवळ सुरू झाली त्यावेळी प्रा. रा. ग. जाधव यांनी दलित साहित्यिकांना आपल्या साहित्यातून बौद्ध तत्त्वज्ञानाचा पुरस्कार करण्याचे आवाहन केले होते. हे आवाहन बाबासाहेबांचे अनुयायी म्हणवणाऱ्यांना पेलता आले नाही. समकालीन लेखक-समीक्षक आजही दलित म्हणवून घेण्यात धन्यता मानत आहेत. साहित्य आज विविध संकल्पनांच्या नावाने ओळखले जात असले तरी त्यातून दिसणारी मानसिकता मात्र दलितच दिसते आहे. एखादा लेखक जेव्हा बौद्ध तत्त्वज्ञानाचा आग्रह धरतो तेव्हा बाबासाहेबांनी 'बहिष्कृत भारता'तून किती वेळा दलित संकल्पना वापरली याचे दाखले दिले जातात. एकविसाव्या शतकात स्वत:ला व त्यांच्या साहित्याला दलित म्हणवून घेणारे आंबेडकरी चळवळ उभी करणाऱ्या जलसेकारांप्रती नव्हे तर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या प्रतीही कृतघ्नताच व्यक्त करीत असतात त्याचे कारण असे की, बहिष्कृत भारतातील बाबासाहेब, धम्मचक्रप्रवर्तनाची घोषणा केल्यानंतरचे बाबासाहेब व प्रत्यक्ष धम्मचक्रप्रवर्तनानंतरचे बाबासाहेब यातला नेमका फरक समजून घेता न आल्याने असे घोटाळे होत असतात. १९५६ च्या धम्मचक्रप्रवर्तनाने एका नव्या संस्कृतीचा स्वीकार त्यांच्या अनुयायांनी केला. त्याचे जतन/संवर्धन करण्याची जबाबदारी ही त्यांच्या अनुयायांचीच आहे. नव्या परंपरेची मांडणीही त्यातून अभिप्रेत आहे. लेखकाचा बौद्ध संस्कृतीशी नाळ जोडण्याचा प्रयत्न स्तुत्य आहे. एकट्याने हे काम करून चालणार नाही. ही जबाबदारी सामुहिक आहे.

भीमराव करडकांनी आपल्या जलशाद्वारे सारा महाराष्ट्र जागवला. त्यातून अनेक जलसाकार उभे राहिले. या जलसाकारात सर्वाधिक योगदान नाशिक जिल्ह्याचे आहे. माझ्या दहा सभा-मिटींग व करडकांचा एक जलसा बरोबर आहे ही बाबासाहेबांनी दिलेली शाबासकीची थाप प्रातिनिधिक आहे. ती करंडकांसाठी जशी आहे तशी आंबेडकरी चळवळीत काम करणाऱ्या तमाम कलावंतासाठीही होती.

डॉ. भगवान ठाकूर यांनी या प्रबंधासाठी खूप कष्ट घेतले आहेत. त्याच्या या कष्टांना आंबेडकरी चळवळीतील प्रत्येक लेखक-वाचक सलाम करील.

'आंबेडकरी जलसे'
सुगावा प्रकाशन, पुणे.

**मोतीराम कटारे**
१०, बौद्धविकास, प्लॉट नं. ३२,
शिवसृष्टी, कुर्ला (पूर्व), मुंबई - ४०० ०२४.

---

पान क्र. ४६ वरून पुढे चालू...

तुझ्यावाचुनी बीजांमधुनी कोण फुले रे ?
तुझ्या वाचुनी रंगांमधुनी कोण खुले रे ?
मीं कधि न पाहिलें तुझें निराळेपण त्यांच्याविण
मीं कधींच नाहीं म्हटलें कीं तू दे मज दर्शन
हेलावे जनसागर माझ्या अवतींभवतीं
खरें सांग, हीं नाना रूपें तुझींच नव्हतीं ?
मनामनांतुन त्यांच्या होती तुझी चेतना
कर्माकर्मामधून होती तुझी प्रेरणा !
मीं कसें उणें तुज करूं त्यांचिया सुखदुःखांतुन ?
मीं कधींच नाहीं म्हटलें कीं तू दे मज दर्शन
तुला पाहिलें ऋतूऋतूंतुन, फुलाफळांतुन,
त्या गगनांतुन, या मातींतुन, स्थितीगतींतुन
संघर्षांतुन, सुखदुःखांतुन, व्यथेव्यथेंतुन
या सृष्टींतुन अन् भवतींच्या मानवतेंतुन
रे कसें शोधुं तुज वेड्यापरि मी तुलाच टाकुन ?
मीं कधींच नाहीं म्हटलें कीं तू दे मज दर्शन

❖❖❖





अनुक्रमणिका

# कार्यवृत्त नोंद :

**१ एप्रिल ते ३१ ऑगस्ट २००७**

**डॉ. वि. भा. देशपांडे,** प्रमुख कार्यवाह

**६ एप्रिल :**

'युवा मंच' च्या वतीने 'आम्ही असे घडलो' हा एक खास कार्यक्रम आयोजित करण्यात आलेला होता. त्यामध्ये प्रा. डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांची मुलाखत प्रा. मिलिंद जोशी यांनी घेतली.

**१० एप्रिल :**

ज्ञानकोशकार डॉ. केतकर स्मृतिदिन. प्रतिवर्षीप्रमाणे कमला नेहरू उद्यानात परिषदेच्या कार्यकर्त्यांनी एकत्रित जमून डॉ. केतकर यांच्या स्मृतीस अभिवादन केले. त्यांच्या आठवणींचा जागर करण्यात आला.

**१८ एप्रिल :**

डॉ. इरावती कर्वे यांच्या शताब्दीनिमित्त 'इरावती एक, दीपमाळ' हा अभिरूप मुलाखतींचा कार्यक्रम झाला. त्यामध्ये अनघा केसकर, भारती पांडे, कुंदा पटवर्धन, सुनंदा थत्ते, शिल्पा जमेनीस, सुनंदा हळबे, अनुपमा बर्वे, ज्योत्स्ना साठे, संध्या गुळवणी, आनंदी जबडे इत्यादींनी सहभाग घेतला. या अभिनव कार्यक्रमाचे स्वागत प्रेक्षकांकडून उत्तम प्रकारे झाले.

**२१ एप्रिल :**

युवा मंचच्या वतीने 'कुणीतरी आठवण काढतंय' या विषयावर काव्यमहिफिल आयोजित करण्यात आली. वैभवी जोशी, प्रसाद शिरगावकर यांचा सहभाग होता.

**२६ मे आणि २७ मे :**

म.सा.प.चा १०१ वर्धापनदिनानिमित्त दोन दिवस विविध कार्यक्रमांचे आयोजन केले होते.

१) म. सा. प. च्या विविध शाखाप्रमुखांचा-कार्यकर्त्यांचा मेळावा आयोजित केला होता.

२) 'ग्रंथ आणि ग्रंथकार' यांना दिली जाणारी पारितोषिके देण्याचा वार्षिक समारंभ डॉ. कुमार सप्तर्षी यांच्या प्रमुख उपस्थितीत झाला. यांच्या जोडीला प्रमुख पाहुणे म्हणून श्री. रामदास फुटाणे होते. समारंभाचे सूत्रचालन श्रीमती नंदा सुर्वे यांनी केले. अध्यक्षस्थानी प्रा. द. मा. मिरासदार होते. कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर, प्रमुख कार्यवाह डॉ. वि. भा. देशपांडे यांची यथोचित भाषणे झाली. ॲड. प्रमोद आडकर यांनी आभार मानले. सौ. मृणाल धोंगडे यांनी शारदास्तवन आणि पसायदान म्हटले.

**२७ मे :**

हा म.सा.प.चा वर्धापन दिन म्हणून साजरा होत असतो. मा. नामदार वळसेपाटील, हे समारंभाचे प्रमुख पाहुणे होते. त्यांनी समारंभाच्या आधी परिषदेच्या वा. गो. आपटे ग्रंथालयास भेट देऊन अनेक गोष्टींची माहिती करून घेतली. या प्रसंगी प्रमुख वक्ते म्हणून प्राचार्य शिवाजीराव भोसले यांचे व्याख्यान झाले. विषय होता 'साहित्य आणि समाज'.

या समारंभात प्रतिवर्षी देण्यात येणारा म.सा.प. गौरव पुरस्कार प्रसिद्ध लेखिका-समीक्षिका प्रा. डॉ.सरोजिनी वैद्य यांना दिला गेला. प्रकृती अस्वास्थ्यामुळे त्या येऊ शकल्या नाहीत, म्हणून त्यांचे पती प्रसिद्ध कवी प्रा. शंकर वैद्य यांनी हा पुरस्कार स्वीकारला. दुसरा पुरस्कार डॉ. भीमराव कुलकर्णी स्मृती निमित्त कार्यकर्ता पुरस्कार दिला जातो. यंदा हा पुरस्कार प्रा. डॉ. द. ता. भोसले (पंढरपूर), यांना देण्यात आला. ॲड. प्रमोद आडकर आणि प्रा. मिलिंद जोशी यांनी सूत्रसंचालन केले.

**२७ मे** च्या वर्धापनानिमित्त म.सा.प.च्या शाखांचा जो मेळावा झाला त्यामध्ये विविध ठिकाणचे ३० प्रतिनिधी आलेले होते. या मेळाव्याचे निमंत्रक श्री. राजन मुठाणे होते. कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी सर्वांचे स्वागत केले. प्रमुख कार्यवाह डॉ. वि. भा. देशपांडे यांनी जुन्या-नव्या उपक्रमांची सविस्तर माहिती दिली. आलेल्या प्रतिनिधींनी आपापल्या शाखांबद्दलची माहिती देऊन काही सूचना, अपेक्षा व्यक्त केल्या. कार्याध्यक्ष डॉ. जोगळेकर यांनी सर्वांना मार्गदर्शनपर भाषण केले. डॉ. वि. भा. देशपांडे यांनी येत्या वर्षभरात

शाखांना भेटी देण्याचा मनोदय व्यक्त करून सर्वांना आवाहन केले.

**३० जून आणि १ जुलै :**

म. सा.प.च्या उपक्रमांपैकी एक महत्त्वाचा भाग म्हणजे विभागीय साहित्य संमेलनाचे आयोजन करणे. यंदा ३० जून आणि १ जुलै या दोन दिवशी इचलकरंजी येथे हे संमेलन आयोजिले होते. (त्याचा वृत्तांत सोबत स्वतंत्रपणे दिलेला आहे.)

**३० जुलै :**

संत सावतामाळी स्मृतिदिन. यावर्षी 'गृहिणी भजनी मंडळ' यांच्या वतीने 'पंढरीची वाट' हा साभिनय-गायनाचा कार्यक्रम झाला. काही अभंगांचे पठण, गायन आणि त्यातल्या दृश्यांचे सादरीकरण असे त्याचे स्वरूप होते. विशेष म्हणजे आपल्या संस्थेतील ग्रंथालयात काम करणाऱ्या सेवक वर्गापैकी मीनाक्षी केळकर, शोभाताई कुलकर्णी यांचा महत्त्वाचा सहभाग होता. निवेदिका होत्या सौ. सुधाताई रानडे.

**२१ जुलै :**

प्रसिद्ध लेखक वा. म. जोशी यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ श्री. रवींद्र भट यांचे 'साहित्यनिर्मिती मागील प्रेरणा' या विषयावर व्याख्यान झाले. सूत्रसंचालन प्रा. मिलिंद जोशी यांनी केले. ह. ल. निपुणगे यांनी प्रास्ताविक केले.

**६ ऑगस्ट :**

'आंतर राष्ट्रीय शांतता दिना'च्या निमित्ताने 'सादाको व हजार बगळे' या इलिनॉर कॉयर यांच्या मूळ इंग्रजी कथेचे मराठी रूपांतर सादर केले. अभिवाचन श्रीमती नीला शर्मा यांनी केले.

❖❖❖

## रौप्यमहोत्सवी<br>महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा इचलकरंजी आयोजित<br>महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणेच्या<br>शतकोत्तर प्रथम वर्षातील विभागीय साहित्य संमेलन २००७<br>३० जून व १ जुलै २००७ वृत्तांकन

महाराष्ट्र साहित्य परिषदेने आपल्या शतकाच्या वाटचालीत अनेक उपक्रम राबविले आहेत. विभागीय साहित्य संमेलन हा अशाच उपक्रमांपैकी एक! कोकणातील खेडनंतर (२००४) यावर्षी परिषदेच्या इचलकरंजी येथील शाखेने वि.सा. संमेलन शनिवार दि.३० जून व रविवार दि. १ जुलै २००७ रोजी इचलकरंजी येथील प्रसिद्ध श्रीमंत ना. बा. घोरपडे नाट्यगृहात आयोजित केले होते. परिषदेच्या मुख्य कार्यालयास स्थापन होऊन १०१ वर्षे व म.सा.परिषदेच्या, इचलकरंजी शाखेस स्थापन होऊन २५ वर्षे झाल्याचे औचित्य या निमित्ताने संयोजकांनी साधले होते.

शानदार उद्घाटन समारंभ, दोन परिसंवाद, निमंत्रितांचे कथाकथन व कविसंमेलन तसेच नवोदितांचे कविसंमेलन, दोन सांस्कृतिक कार्यक्रम व समारोपाचा भव्य कार्यक्रम, भर पावसात संपूर्ण दोन दिवस अतिशय उत्साही वातावरणात साजरे झाले. इचलकरंजीकर साहित्य रसिकांच्या प्रत्येक कार्यक्रमास भरभरून लाभलेल्या प्रतिसादामुळे उत्तरोत्तर रंगत गेलेले 'विभागीय साहित्य संमेलन' म्हणून हे संमेलन उपस्थित साहित्य रसिकांच्या दीर्घकाळ लक्षात राहील.

३० जून २००७, शनिवारी हे संमेलन सायंकाळी ५ वाजता सुरू झाले. तो संपूर्ण दिवस इचलकरंजी व परिसरात अखंड पाऊस सुरू होता. श्रीमंत ना. बा. घोरपडे नाट्यगृहाच्या आवारातच ग्रंथदिंडी मिरविण्यात आली. शिरस्त्याप्रमाणे ज्ञानेश्वरी, गाथा, राज्यघटना, अशी पुस्तके ह्या ग्रंथदिंडीत होती व भरीला विविध पारंपरिक वेष परिधान केलेले इचलकरंजीतील विविध शाळातील उत्साही विद्यार्थी/विद्यार्थिनींचा प्रचंड ताफा होता. व्यासपीठावर संमेलनाध्यक्ष रामदास फुटाणे, शिक्षणमंत्री नामदार वसंतराव पुरके, ज्येष्ठ कादंबरीकार बाबा कदम, नगराध्यक्षा सौ. किशोरी आवाडे,







अनुक्रमणिका

स्वागताध्यक्ष आमदार प्रकाशराव आवाडे, आ. शरद पाटील, मसापचे प्रमुख कार्यवाह डॉ. वि. भा. देशपांडे, विभागीय साहित्य संमेलनाचे केंद्रीय निमंत्रक राजन मुठाणे इ. मान्यवर तुतारीच्या निनादात स्थानापन्न झाले. तसेच प्रेक्षागृहात पहिल्या रांगेत साहित्य क्षेत्रातील प्रा. हातकणंगलेकर, झाडबुके, वसंत पाटील, प्रा. वैजनाथ महाजन, डॉ. माधवी वैद्य, नंदा सुर्वे, मसापचे कोषाध्यक्ष ह. ल. निपुणगे, डॉ. सतीश देसाई, पद्माकर कुलकर्णी, डॉ. पांडुरंग काळे, डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी ही मान्यवर मंडळी उपस्थित होती. प्रारंभी दीप प्रज्वलन, गणेशवंदना, शाहीर विजय जगताप यांचे स्वागतगीत, देगईस्कर यांचे अद्भुत कंठशहनाई वादन होऊन नंतर उपस्थित मान्यवरांचे गुच्छ देऊन स्वागत करण्यात आले. संमेलनाध्यक्ष रामदास फुटाणे व प्रमुख पाहुणे ना. वसंत पुरके यांचे स्वागत श्री. राजन मुठाणे यांनी केले व संजय होगाडे यांनी प्रकाशराव आवाडेंचे स्वागत केले. यावेळी प्रेक्षागृहात रसिकांची तुडुंब गर्दी झाली होती. या उद्घाटन समारंभाचे सूत्रसंचालन इचलकरंजी म.सा.प. शाखेचे उपाध्यक्ष अशोक दवंडे व प्रसाद कुलकर्णी करत होते. मसाप इचलकरंजी शाखेचे अध्यक्ष विजयराव जगताप यांनी प्रास्ताविक केले. केंद्रीय निमंत्रक राजन मुठाणे यांनी आपली भूमिका स्पष्ट केली. मसाप पुणेचे प्रमुख कार्यवाह डॉ. वि. भा. देशपांडे यांनी मनोगत सांगितले. त्यानंतर आमदार व संमेलनाचे स्वागताध्यक्ष प्रकाशराव आवाडे यांचे स्वागतपर भाषण झाले. आमदार शरद पाटील यांनीही भाषण केले. त्याचप्रमाणे नगराध्यक्षा किशोरी आवाडे यांचे भाषण झाले. स्वाती महाळंक यांनी संमेलनाध्यक्ष रामदास फुटाणे यांचा परिचय करून दिला.

'साद देती यश शिखरे' या सुरेश महाजन लिखित पुस्तकाचे रामदासजी फुटाणे यांचे हस्ते प्रकाशन झाले. तसेच विजय जगताप लिखित 'महाराष्ट्रातील राष्ट्रीय शाहीर' या पुस्तकाचे प्रमुख पाहुणे व शिक्षणमंत्री नामदार वसंतराव पुरके यांच्या हस्ते प्रकाशन झाले. त्यानंतर मा. वसंतराव पुरके यांचे प्रमुख पाहुणे या नात्याने प्रदीर्घ भाषण झाले. त्यानंतर संमेलनाध्यक्ष रामदास फुटाणे यांनी आपले अध्यक्षीय विचार थोडक्यात मांडले.

'साहित्य, प्रसार माध्यमे आणि अभिरुची' या विषयावर डॉ. महेश केळुसकर यांच्या अध्यक्षतेखाली संमेलनातील पहिला परिसंवाद झाला. अभिनेते डॉ. गिरीश ओक, दूरदर्शनचे नितीन सप्रे, प्रा. अशोक दास या वक्त्यांनी सहभाग घेतला. डॉ. गिरीश ओक यांनी कलाकारांची बाजू ठामपणे उचलून धरली. तर नितीन सप्रे यांनी आपली असमर्थता व्यक्त केली. प्रा. दास यांनी साहित्य, अभिरुची यांची कुचंबणा आणि प्रसार माध्यमांची अरेरावी अशा रोखाने आपले विचार मांडले. डॉ. महेश केळुस्कर यांनी अध्यक्षीय परामर्श घेतला.

रात्री १०॥ च्या पुढे निमंत्रित कवींचे कविसंमेलन संमेलनाध्यक्ष व प्रसिद्ध वात्रटिकाकार रामदास फुटाणे यांच्या अध्यक्षतेखाली आटोपशीर व रंगतदार झाले. प्रा. सुनंदा शेळके (जत) व भीमराव धुळूबुळू यांनी सूत्र-संचालन केले. अशोक नायगांवकर (मुंबई), प्रकाश होळकर (लासलगांव), महेश केळुसकर (मुंबई), सुरेश शिंदे (मंगळवेढा), अशोक भोईटे (कोल्हापूर), विजय चोरमारे (कोल्हापूर), सुरेश मोहिते (वाळवा), प्रसाद कुलकर्णी (इचलकरंजी), रघुराज मेटकरी (विटा), दिलीप कुलकर्णी (कुरुंदवाड), स्वाती शिंदे-पवार (कार्वे), वैशाली नायकवडे (इचलकरंजी), दिलीप सुतार (कुरुंदवाड), दीपक करंदीकर (पुणे), डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी (पुणे), इ. कवींनी या कविसंमेलनात भाग घेतला.

रविवार दि. १ जुलै२००७ रोजी सकाळी १०.३० च्या दरम्यान निमंत्रितांचे बहारदार कथाकथन झाले. प्रसिद्ध कथाकथनकार प्रा. आप्पासाहेब खोत अध्यक्षस्थानी होते. उज्ज्वला जाधव (इचलकरंजी), शर्मिला शहा (इचलकरंजी), मारुती यादव (पुणे), बाळ बाबर (जयसिंगपूर), साहेबराव चौरे (झरे) आणि स्वतः आप्पासाहेब खोत यांनी कथाकथन केले. यावेळेस सुद्धा प्रेक्षागृह तुडुंब भरले होते.

लगेचच संमेलनातील दुसरा परिसंवाद झाला. अध्यक्ष-प्रा. पी. बी. पाटील (सांगली) यांच्या अनुपस्थितीत डॉ. वि. भा. देशपांडे यांनी अध्यक्षीय जबाबदारी पेलली. कमीत कमी वेळात पण अतिशय माहितीपूर्ण असा हा एक दर्जेदार परिसंवाद झाला. विषय

होता लोककलांचे साहित्यातील स्थान आणि वक्ते होते. शाहीर विजय जगताप (इचलकरंजी), डॉ. बाळकृष्ण लळीत (सिंधुदुर्ग), डॉ. गिरी (कोल्हापूर), डॉ. विश्वनाथ शिंदे (कोल्हापूर), या वक्त्यांनी शाहिरी काव्य, दशावतारी खेळे, भेदीक काव्य, या सारख्या लोककलांचा साहित्यातील संबंध यांविषयावर परामर्श घेतला.

दुपारी 'भक्तिरंग' हा मराठी संतांच्या रचनांवर आधारित स्थानिक कलाकारांचा कार्यक्रम झाला व स्वातंत्र्यसंग्राम १५० वर्षे पूर्ततेबद्दल स्थानिक शाहिरांचा अतिशय स्फूर्तिदायक पोवाड्यांचा कार्यक्रम झाला.

सायंकाळी ५ नंतर सन्माननीय पाहुणे अ. भा. मराठी साहित्य संमेलन, नागपूरचे अध्यक्ष अरुण साधू व विभागीय साहित्य संमेलनाचे अध्यक्ष रामदास फुटाणे यांच्या उपस्थितीत संमेलनाचा समारोपाचा कार्यक्रम झाला. यावेळी व्यासपीठावर डॉ. वि. भा. देशपांडे, श्री. ह. ल. निपुणगे, मसाप प्रतिनिधी पद्माकर कुलकर्णी, डॉ. काळे, स्वागताध्यक्ष आमदार प्रकाशराव आवाडे, केंद्रीयनिमंत्रक राजन मुटाणे, प्रताप होगाडे, विजय जगतात इ. उपस्थित होते.

विभागीय साहित्यसंमेलनाच्या यशात विविध प्रकारे हातभार लावणाऱ्यांचा सत्कार प्रमुख पाहुणे अरुण साधू यांच्या हस्ते झाला. प्रास्तविक डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले व प्रकाशराव आवाडे यांनी आपले विचार प्रकट केले. त्यांच्या हस्ते प्रमुख पाहुणे अरुण साधू यांचा शाल, श्रीफळ, सन्मानचिन्ह देऊन सत्कार करण्यात आला. यानंतर स्वाती महाळंक यांनी प्रमुख पाहुणे अरुण साधू यांचा परिचय करून दिला. नंतर 'शब्दवस्त्र' या स्मरणिकेचे श्री. अरुण साधू यांच्या हस्ते प्रकाशन झाले. संमेलनाध्यक्ष रामदास फुटाणे यांनी आपल्या काही काव्यरचनांची अधूनमधून पेरणी करत अध्यक्षीय मनोगत श्रोत्यांसमोर प्रभावीपणे मांडले. त्यानंतर अरुण साधू यांनी प्रमुख पाहुणे या भूमिकेतून आपले विचार प्रकट केले. श्री. राजन मुठाणे यांनी आभार प्रदर्शन केले. शेवटी पसायदान कु. श्रद्धा कामत यांनी सादर केले व रात्री नामदेव भवनात स्थानिक परिसरातील विशेषतः नवोदित कवींचे कविसंमेलन झाले. दोन दिवसांच्या वास्तव्यात बाहेरगावच्या प्रतिनिधींची, म.सा.प.च्या पदाधिकाऱ्यांची व निमंत्रितांची भोजननिवासादी उत्तम व्यवस्था करण्यात आली होती.

❖❖❖

---

कार्यवृत्त

## म. सा. परिषद शाखा सोलापूर
## त्रैमासिक अहवाल

१) ८ एप्रिल २००७ रोजी, १ एप्रिल २००६ ते ३१ मार्च २००७ या वर्षातील वार्षिक सर्वसाधारण सभा, सेवासदन सभागृह येथे सकाळी १० वा. घेण्यात आली. अध्यक्षस्थानी मा. कविवर्य दत्ता हलसगीकर हे होते. सर्व विषयावर चर्चा होऊन जमाखर्च व अंदाजपत्रकास सर्वानुमते मंजुरी देण्यात आली.

२) एप्रिल महिन्यात महिलांसाठी 'तरीही सूर जुळले' या विषयावर निबंध स्पर्धेचे आयोजन करण्यात आले होते. ४९ महिलांनी या निबंधस्पर्धेत सहभाग घेतला. निबंधाचे परीक्षण पुष्पा आगरकर यांनी केले. बक्षिसपात्र क्रमांक पुढीलप्रमाणे—

प्रथम क्रमांक -माधुरी शहा

द्वितीय क्रमांक -मीरा अत्रे

तृतीय क्रमांक - राजश्री भोसले

उत्तेजनार्थ - १) विजया बलदोटा, २) मीनल जोशी

१७ एप्रिल २००७ रोजी, ज्येष्ठ लेखिका सुरेखा शहा यांच्या हस्ते प्रमाणपत्र व बक्षिसे देण्यात आली व सर्व रसिक श्रोत्यांना मार्गदर्शन केले. या कार्यक्रमाची जबाबदारी कार्यकारिणी सदस्या सीमा होसुरकर व शोभना सागर यांनी यशस्वीपणे पार पाडली.

३) पु. ल. स्मृती दिनानिमित्त १२ जून २००७ रोजी 'बहुरुपी पु.ल.' हा कार्यक्रम सेवासदन सभागृहात घेण्यात आला. आकाशवाणी कलावंत रजनीश जोशी व सुनीता तारापुरे यांनी हा कार्यक्रम सादर करून पु.लं.च्या

जीवनातील अनेक पैलू रसिक श्रोत्यांना उलगडून दाखविले.

४) म. सा. परिषद तुमच्या दारी या कार्यक्रमाअंतर्गत शहरातील पूर्व भागातील कर्णिक नगर येथील उत्कर्ष वाचनालयात 'मी वाचलेले पुस्तक' हा कार्यक्रम घेण्यात आला. ७ जुलै २००७ रोजी घेण्यात आलेल्या या कार्यक्रमात सोलापूर आकाशवाणीचे प्रमुख श्री. सुनील शिनखेडे यांनी 'समिधा' शोभा बोल्ली यांनी 'डबल लाईफ' व नितीन वैद्य यांनी 'भूमी' व इतर काही पुस्तकावर आपले विचार व्यक्त केले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी म.सा.प. चे कार्याध्यक्ष डॉ. सुहास पुजारी होते. या कार्यक्रमाची जबाबदारी कार्यकारिणी सदस्य व ज्येष्ठ पत्रकार श्री. अरविंद जोशी यांनी उत्कृष्टपणे पार पाडली.

**प्रा. प्रेमचंद मेने**
कार्यवाह - म.सा.प.
सोलापूर

---

## शाखा बार्शी कार्यवृत्त

१) महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणेच्या १०१ व्या वर्धापन दिनाच्या निमित्ताने या वर्षीचा शाखा मेळावा रविवार, दि. २७ मे २००७ रोजी पुणे येथे आयोजित करण्यात आला होता. या मेळाव्यास बार्शी शाखेतर्फे महाराष्ट्र साहित्य परिषद बार्शी शाखेचे अध्यक्ष श्री. श्यामसुंदर द. मुळे, कार्याध्यक्ष ॲड. प्रशांत शेटे व प्रमुख कार्यवाह श्री. शब्बीर मुलाणी हे उपस्थित होते. यांनी मेळाव्यात सहभागी होऊन शाखेच्या अडीअडचणींवर विचारविनिमय केला. पुणे शाखेच्या पदाधिकाऱ्यांनी मार्गदर्शन केले.

२) महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा बार्शीतर्फे दिनांक २४/०७/२००७ रोजी सायंकाळी साडेसहा वाजता सार्वजनिक वाचनालयाच्या सभागृहात कविश्रेष्ठ सुरेश भट यांच्या रचनांवर आधारित गीते, गझल व गाण्यांच्या श्रवणीय मैफलीचे आयोजन करण्यात आले होते. मसापच्या बार्शी शाखेचे अध्यक्ष श्री. श्यामसुंदर मुळे यांनी प्रास्ताविक भाषण केल्यावर डॉ. दीपा सावळे, ॲड. प्रशांत शेटे, डॉ. प्रशांत माहिरे व डॉ. बी. डी. पारसे यांनी सुरेश भटांच्या गाजलेल्या कविता व गझला प्रभावीपणाने सादर केल्या. सौ. अर्चना पानसे यांनी गायिलेल्या 'मालवून टाक दीप', 'मल्मली तारुण्य माझे', 'चल ऊठ रे मुकुंदा', 'मेंदीच्या पानावर' आदी सुमधुर गीतांनी कार्यक्रमात रंगत आणली. कार्यक्रमाचे निवेदन मुकुंदराज कुलकर्णी यांनी केले. यावेळी ॲड. प्रणावी शेटे यांचा बालकुमार साहित्य मंचच्या बार्शी शाखेच्या अध्यक्षपदी निवड झाल्याबद्दल सत्कार करण्यात आला.

३) महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या बार्शी शाखेचे आजीव सदस्य डॉ. कृष्णा मस्तुद यांची माईंड मॅटर्स या संस्थेच्या वतीने रोमानियाची राजधानी बुखारेस्ट (युरोप) येथे आयोजिलेल्या आठव्या मनोविकार शास्त्राच्या जागतिक परिषदेसाठी निवड झाल्याबद्दल आणि प्रा. चंद्रहंस गंभीर यांच्या परदेशगमनाबद्दल (परिषदेत निवड झाल्याबद्दल) बार्शी शाखेतर्फे अध्यक्ष श्री. श्यामसुंदर मुळे यांनी अभिनंदन केले व त्यांना शुभेच्छा दिल्या.

४) महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे दि. ३० जून २००७ रोजी इचलकरंजी येथे भरलेल्या विभागीय साहित्य संमेलनाला बार्शी शाखेतर्फे अध्यक्ष श्री. श्यामसुंदर मुळे, कार्याध्यक्ष प्रशांत शेटे, कोषाध्यक्ष डॉ. मोहिरे व कार्यवाह शब्बीर मुलाणी हे उपस्थित होते. त्यांनी पुढील विभागीय साहित्य संमेलन बार्शी येथे घेण्याची महाराष्ट्र साहित्य परिषदेला विनंती केली. कार्यवाह श्री. राजन मुठाणे यांनी पुढील विभागीय साहित्य संमेलन बार्शीस घेण्याचे टाळ्यांच्या गजरात जाहीर केले. यावेळी सोलापूरचे श्री. पद्माकर कुलकर्णी हे व्यासपीठावर उपस्थित होते.

**श्यामसुंदर द. मुळे**
अध्यक्ष, शाखा बार्शी



अनुक्रमणिका

## अहमदनगर शाखा कार्यवृत्तांत

कवयित्री व परिषदेच्या नगर शाखेच्या अध्यक्षा डॉ. सुधा कांकरिया लिखित "अर्चनावाणी" पुस्तकाचा प्रकाशन सोहळा ज्येष्ठ साहित्यिक गोपाळराव मिरीकर यांच्या हस्ते व श्री समर्थ विद्यापीठाचे कुलगुरू सुधाकर दाभोळकर यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाला. संस्कार-संस्कृतीचा ठेवा असलेले हे पुस्तक प्रत्येक घराघरातून वाचले गेले पाहिजे असे मनोगत मान्यवरांनी व्यक्त केले.

"गोधडीकार" अण्णासाहेब देशमुख, ज्येष्ठ साहित्यिका सरोजिनी वैद्य यांच्या दुःखद निधनाबद्दल परिषदेने हळहळ व्यक्त करून श्रद्धांजली वाहिली.

अहमदनगरचे सुपुत्र कवी. ग. ल. ठोकळ यांच्या स्मरणार्थ परिषदेतर्फे "काव्यजागर" कार्यक्रमाचे आयोजन केले होते, साहित्य परिषदेचे संपादक डॉ. सु. प्र. कुलकर्णी, यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झालेल्या या कार्यक्रमात कवी ठोकळ, यांच्या कवितेचे वाचन डॉ. सुधा कांकरिया, मेधाताई काळे, क्रांतीकला अनभुले, चंद्रकांत पालवे यांनी केले. व यानिमित्त आयोजित कविसंमेलनात जिल्ह्यातील सुमारे ४३ कवींनी आपला सहभाग नोंदविला. प्रा. डॉ. चं. वि. जोशी, प्रा. डॉ. सुधाकर कुऱ्हाडे यांनी या कार्यक्रमाचे संयोजन केले. स्वागत अध्यक्ष डॉ. सुधा कांकरिया यांनी तर आभार कार्यवाह किशोर मरकड यांनी मानले. सदर कार्यक्रमास भास्करराव डिक्कर, प्रा. धोंडिराम वाडकर, टी.एन. परदेशी सह जिल्ह्यातील साहित्यिक - रसिक मोठ्या संख्येने उपस्थित होते. डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांनी "ग. ल. ठोकळ यांच्या कविता" या विषयावर मार्मिक भाषण केले.

**आगामी**

* हस्ताक्षर आणि शुद्धलेखन स्पर्धा.
* शालेय वयोगटातील मुलांमध्ये वाचनसंस्कृती वाढविण्यासाठी 'छंद वाचनाचा' हा उपक्रम.
* दिवाळी अंकांचे प्रदर्शन.

**डॉ. सुधा कांकरिया**
अध्यक्ष - मसाप, शाखा अहमदनगर.

## देणगीदार - एप्रिल ते सप्टेंबर २००७

| | दिनांक | नाव | रक्कम | उद्देश |
|---|---|---|---|---|
| १) | १७/४/२००७ | डॉ. सु. प्र. कुलकर्णी | २४८/- | योगक्षेमार्थ देणगी |
| २) | २४/४/२००७ | राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ | ६००००/- | योगक्षेमार्थ देणगी |
| ३) | २८/४/२००७ | डॉ. सदाशिव रा. गाडगीळ | ५००००/- | स्मृतिदिनासाठी देणगी |
| ४) | ४/५/२००७ | डॉ. सदाशिव रा. गाडगीळ | ३०००/- | स्मृतिदिनासाठी देणगी |
| ५) | ७/५/२००७ | सौ. विजया पांडुरंग जोशी | ५५०/- | इमारत निधीसाठी |
| ६) | १०/५/२००७ | श्री. प्रभाकर भावे | ५०००/- | योगक्षेमार्थ देणगी |
| ७) | १७/५/२००७ | रोटरी क्लब ऑफ शिवाजीनगर | ५०००/- | ग्रंथालयासाठी देणगी |
| ८) | १७/५/२००७ | संस्कृती प्रकाशन, पुणे | १००००/- | योगक्षेमार्थ देणगी |
| ९) | १७/५/२००७ | संस्कृती प्रकाशन, पुणे | १००००/- | योगक्षेमार्थ देणगी |
| १०) | २३/५/२००७ | सौ. आशा नं. जोशी | ५००/- | योगक्षेमार्थ देणगी |
| ११) | २७/५/२००७ | डॉ. सु. प्र. कुलकर्णी | ३००/- | योगक्षेमार्थ देणगी |
| १२) | २९/५/२००७ | डॉ. पद्माकर रा. दुभाषी | ११०००/- | योगक्षेमार्थ देणगी |
| १३) | ४/६/२००७ | श्री. रमेश विष्णू बोकील | १०००००/- | स्मृतिदिनासाठी देणगी |
| १४) | ७/६/२००७ | डॉ. सु. प्र. कुलकर्णी | १८८/- | योगक्षेमार्थ देणगी |
| १५) | ९/६/२००७ | श्री. माधव रामभाऊ सातव | १२५/- | योगक्षेमार्थ देणगी |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १६) | २८/७/२००७ | दि महाराष्ट्र एक्झिक्युटर ॲण्ड ट्रस्टिज कं.लि. | ५०००/- | का.र.मित्र व्याख्यानमालेसाठी देणगी |
| १७) | ३१/७/२००७ | श्री. र. रा. गोसावी | १०००/- | इमारत निधी |
| १८) | ३०/८/२००७ | अनामिक | १००००/- | ग्रंथालयासाठी देणगी, पुस्तके खरेदीसाठी |
| १९) | ३/९/२००७ | श्री. बजरंग शेलार | १०००/- | इमारत निधी |
| २०) | ४/९/२००७ | डॉ. म. कृ. नाईक | १०००/- | ग्रंथालयासाठी देणगी |
| २१) | ३०/९/२००७ | श्री. प्रणव अरविंद कुलकर्णी | १०००००/- | कै.डॉ.अरविंद वामन कुलकर्णी यांचे स्मरणार्थ |

## नवे आजीव सभासद - एप्रिल ते सप्टेंबर २००७

१) रेगे गोविंद राजाराम (पुणे)
२) रेगे जयश्री राजाराम (पुणे)
३) केळकर उल्का केदार (पुणे)
४) मुळावकर कल्पना संतोष (आंबाजोगाई)
५) मुळावकर संतोष मोतीराम (आंबाजोगाई)
६) भगत संजय जनार्दन (पुणे)
७) मोरे स्वाती ईश्वर (पंढरपूर)
८) पाटील शशिकांत कल्याणराव (पंढरपूर)
९) गोसावी अंजली विजय (भोसरी)
१०) कटक सुभाष मंगेशराव (पुणे)
११) महाळंक स्वाती माधव (पुणे)
१२) ठबे प्राजक्ता वसंतराव (अहमदनगर)
१३) सबने अरुणा पंजाबराव (नागपूर)
१४) गाडगीळ एच. जी. (सांगली)
१५) महाजन जे. डी. (सातारा)
१६) इंगोले बाळाजी शेषराव (उदगीर)
१७) नागपूरकर मंजिरी माधव (पुणे)
१८) नवरे शेखर शिवराम (पुणे)
१९) सप्रे स्नेहल सुभाष (डोंबिवली)
२०) म्हेत्रे बाळकृष्ण काशिनाथ (पुणे)
२१) बावने रवीन्द्रकुमार गोविंदराव (जळगाव)
२२) घागुर्डे वंदना रवींद्र (चिंचवड)
२३) आखाडे संजय ज्ञानदेव (नाशिक)
२४) गायकवाड महेश नारायण (खिडवाडी)
२५) गायकवाड दीपक बबन (पुणे)
२६) मुनोत सरला पोपटराव (निगडी)
२७) लोहारे नागनाथ संग्राम (निगडी)
२८) बागुल शिवा कडू (दिघी)
२९) धुमाळ जनार्दन भागवत (दिघी)
३०) कुंभोजकर वासंती वासुदेव (चिंचवड)
३१) शेट्टी रघुराम (चिंचवड)
३२) गावडे कुंडलिकराव सिताराम (चिंचवड)
३३) गोडबोले निशीकांत वासुदेव (पिंपरी)
३४) चौधरी नेहा मुकेश (चिंचवड)
३५) कोठारी अशोक मो. (निगडी)
३६) रंगिले किरण दादाराव (पिंपळे निलख)
३७) जांभुळकर पुजा राहुल (पुणे)
३८) जाल्गी प्रियदर्शनी आनंद (पुणे)
३९) ठाकूर किरण धोंडोपंत (बेळगाव)
४०) घुले चारूशीला भास्कर (पुणे)
४१) आगवेकर जयंत वासुदेव (पुणे)
४२) कोगे महेश ज्ञानदेव (बोलावीवाडी)
४३) इनामदार सुहास नारायण (कराड)
४४) शेंडे (पवार) नीता शशांक (पुणे)
४५) कुलकर्णी दिनकर प्रभाकर (पुणे)
४६) शिंदे राहुल चंद्रकांत (पंढरपूर)
४७) शिंदे मंगेशराव पोपटराव (खटाव)
४८) खांडेकर मुक्ता शेलेश (पुणे)
४९) बोपर्डीकर मधुसुदन ना. (अ.नगर)
५०) डी. एम. भुले (नवी दिल्ली)
५१) कोळी संजयकुमार शं. (नवी सांगवी)
५२) सोनीगरा प्रवीण पी. (चिंचवड)
५३) पोपळे राजेंद्र प्र. (पिंपरी)
५४) जगताप संजय वसंत (वाकड)
५५) लेले अविनाश मधुसुदन (चिंचवड)
५६) लेले आसावरी अविनाश (चिंचवड)
५७) जाधव कल्पना प्रकाश (निगडी)
५८) पारेख चंद्रकांत रसिकलाल (चिंचवड)
५९) ताटे प्रकाश (नवी सांगली)
६०) कुलकर्णी बाळासो विनायक (नवी सांगवी)
६१) शेवाळे विजय बाबुराव (चिंचवड)
६२) तलरेजा श्रावण मोरूमल (पिंपरी)
६३) पवळे सुमनताई मधुकरराव (निगडी)
६४) मराठे उज्वला अनील (चिंचवड)
६५) दरडा चंदनमल अमोलकचंद्र (चिंचवड)
६६) माने शैलजा कालिदास (सातारा)
६७) तांबोळी इकबाल जानीसाहेब (सोलापूर)
६८) शेडगे मीरा राजेंद्र (सोलापूर)
६९) शेडगे राजेंद्र नारायण (सोलापूर)
७०) भागवत विवेक गोविंद (पुणे)
७१) डागवाले लता रंगनाथ (अ. नगर)
७२) शहा एकता संतोष (पुणे)
७३) पानगंटी प्रदीप नारायण (पुणे)
७४) घोटकर दयानंद लक्ष्मण (पुणे)
७५) घोटकर प्राची दयानंद (पुणे)
७६) मुळीक किर्ती मिलिंद (पुणे)
७७) दहिभाते राजेंद्र गणपत (पुणे)
७८) इंगळे नरेंद्र शिवबाला (सोलापूर)
७९) दामले रघुनाथ विनायक (सोलापूर)
८०) फोपे राजाराम गणेश (पुणे)
८१) कुलकर्णी प्रवीण दिगंबर (अ. नगर)
८२) कुलकर्णी सुलभा प्रवीण (अ. नगर)
८३) बडवे विलास नारायण (अ. नगर)
८४) शेळके सुनंदा सुभाष (जत)

Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : April to September 2007
Registered with the register of Newspaper for India under No. 6398/57



बुक-पोस्ट



प्रेषक
प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे-४११०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३.

प्रति